


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

# नवी क्षितिजे

किमत ५ रुपये

वर्ष-०८
अंक-२८



अनुक्रमणिका

वर्ष सातवे

अंक २८ वा

ए. मे जू. ७५



संपादक
नाना जोशी
विश्वास पाटील

रचना
पामार्ट
मुंबई २८

पत्र व्यवहाराचा पत्ता
विश्वास पाटील
पुष्प कुंज, पालखी वाडी
१३, काशिनाथ धुरु रोड मुंबई २८

मुद्रक व प्रकाशक
शुभांगी जोशी
३२९ वि. प. रोड मुंबई ४

वार्षिक वर्गणी
रु. १२-५०

या अंकाची
किंमत रु. ४

**मालक :** सौ. शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४

**मुद्रण स्थळ :**
विमा मुद्रक आणि प्रकाशक लि.,
सातारा, यांचा विमा छापखाना.
४१५ ००२

# अनुक्रमणिका

# संपादकीय :

हा सव्विसावा अंक. या अंकात सगळ्या चालू लेखमालाच आहेत. तरीही कादंबरीवरच्या लेखांकात वाङ्मयीन वास्तववादासंबंधी काही नवी दृष्टी आपणास आढळावी.

सामान्यतः वस्तुस्थितीच्या हुबेहूब प्रतिरूपणाला आपण वास्तववाद समजतो. वास्तववादाची ही कल्पना एका चुकीच्या प्रमेयावर आधारीत आहे. माणसाला (त्यात वाचकही आला) आपण केवळ पॅसिव्ह यंत्र समजतो. चालना व प्रतिसादांचे एक भेंडोळे. माणूस म्हणजे माणसाच्या यांत्रिक सवयी—कंडिशन्ड रिफ्लेक्सिस. या व्याख्येप्रमाणे माणूस 'अॅक्ट' न करता फक्त 'रिॲक्ट' होतो. स्वतः पुढाकार घेऊन तो जीवनाला भिडत नाही. आल्या चालनेला तो फक्त प्रतिसाद देतो. माणसाचे हे चित्र चुकीचे आहे. माणून 'अॅक्ट' आणि 'रिॲक्ट' दोन्हीही करतो. मुख्य म्हणजे मर्माशी तो सर्वतया स्वतंत्र आहे. कारण त्याची जाणीव स्वतंत्र आहे. कोठल्याही क्षणी 'मी हे करणार नाही' अशी ठाम भूमिका तो घेऊ शकतो. स्वतःचे स्वातंत्र्य निश्चयपूर्वक अंमलात आणू शकतो.

आपल्या कादंबऱ्यातले नायक केवळ यंत्रे असतात. आल्या आल्या पात्रांच्या व्याख्या कादंबरीकार आपणास देतो. पुढे कादंबरीभर पात्रे त्या व्याख्या गिरवितात, अनेकदा आपल्या कादंबऱ्या अंतर्हीन वाटतात ते याचमुळे. लेखकाची इच्छा झाल्यास लेखक घटना हव्या तेवढ्या वाढवू शकेल इतका वाव या कादंबऱ्यात त्याला असतो. पात्राना आपापले स्वत्व नसते. ही पात्रे वाचकाला त्यांच्यामध्ये गुंतण्यास भाग पाडू शकत नाहीत. वाचक केवळ नोंद घेत राहातो. अधूनमधून त्याची सहानुभूती जागृत झाली तर झाली !

श्री. वसणकर म्हणतात की डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यातला वास्तववाद यापेक्षा अगदी वेगळा आहे. डोस्टोव्हस्कीसुद्धा कथेच्या ओघात नवे पात्र आले की त्याची ओळख करून देतो. पण ही ओळख अल्पकाळच टिकते. कारण कादंबरी पुढे वाचू लागताच आपल्या ध्यानात येते की लेखकाने करून दिलेली ओळख अगदीच जुजबी असून आपली आपल्यालाच ती करून घ्यावयास हवी. म्हणजेच प्रत्यक्ष जीवनात ज्याप्रमाणे समोरच्या माणसांशी वागता वागता त्यांच्या ओळखी आपण करून घेतो तसे येथे करावे लागते. वसणकरांचा हा मुद्दा आपणास वेधक वाटावा.

—संपादक

अनुक्रमणिका



## मानवी आक्रमक प्रवृत्ती (८):

( अँथनी स्टोर व कोनराड लॉरेंझ
यांच्या ग्रंथावरून )

समाजाचे अशा प्रकारे विघटन घडू नये यासाठी काही एका शिस्तीने परंपरा बदलण्याचे प्रयत्न घडावे लागतात. समाज अधिकाधिक गुंतागुंतीचा बनणे ही समाजाच्या हिताची गोष्ट असते. किंबहुना आधिकाधिक संकुलतेकडे (Complexity) प्रगती करणे हाच जीवनाचा जैविक कायदा आहे. मूळ रचनेचे विघटन आणि नवीन स्तरावर उच्च प्रकारचे संघटन यावाचून कुठल्याही प्रकारची उत्क्रांती शक्य नसते. परंतु त्याचबरोबर हीही गोष्ट महत्त्वाची आहे की विभिन्नीकरणातून ही जी अधिक संकुलता येते ती येण्यासाठी मूळात त्या व्यवस्थेचा पाया भरभक्कम हवा. हा पाया जर भरभक्कम नसेल तर ती व्यवस्था तिथल्या तिथे मोडून पडेल. भक्कम पायाचा हा नियम सचेतन तसाच अचेतन व्यवस्थेलाही लागू आहे. सचेतन व्यवस्थेच्या किंवा जीवीवस्तूच्याबाबतीत आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रत्येक वरच्या प्रतीच्या विभिन्नीकरणासाठी त्या जीवीवस्तूला हालचालींच्या मूळच्या स्वातंत्र्यापैकी काही स्वातंत्र्य गमवावे लागते. उदा., गांडूळ हा एकावयवी प्राणी घ्या. गांडूळ हा प्राणी उत्क्रांतीच्या अगदी खालच्या पायरीवर आहे. गांडूळ आपले संपूर्ण शरीर कुठल्याही दिशेला, कुठल्याही प्रकारे वळवू शकते. त्याउलट गोष्ट खेकड्यासारख्या भिन्नभिन्न अवयव असणाऱ्या प्राण्याची आहे. खेकड्याला गांडुळाइतक्या मुक्तपणे हालचाल करता येत नाही. परंतु फार झपाट्याने हालचाल करता येते व भिन्नभिन्न अवयवांचा भिन्नभिन्न उपयोग करता येतो. अनेक अवयवांच्या फायद्याकरिता खेकड्याला काही स्वातंत्र्याची किंमत मोजावी लागते. खेकड्याला गांडुळाइतक्या मुक्त हालचाली करता येत नाहीत; पण त्याच्या बदल्यात इतर कित्येक प्रकारच्या हालचाली व क्रिया खेकड्याला करता येतात. अनेक अवयव किंवा रचनेची संकुलता हे अशा प्रकारे उत्क्रांतीच्या धकाधकीत फायद्याचे असते. सावयव प्राणी फक्त सांध्याच्या ठिकाणीच वळू शकतो. परंतु तसे असले तरी सावयव प्राणी एकावयवी गांडुळापेक्षा अधिक उच्च पायरीवरील प्राणी आहे. जीवनसंघर्षात तो अधिक शक्तीने टिकाव धरू शकतो. बाह्य परिस्थितीत बदल होऊन अधिक स्वतंत्र हालचालीची गरज त्याला

भासू लागली की परत एकदा त्याचे शरीर मोडते व तिथे नवीन सांधे तयार होतात. हे सांधे त्याला हालचालीचे स्वातंत्र्य मिळवून देतात. बाह्य परिस्थिती वा आंतरिक निकड ह्यांच्यामुळे अधिक स्वातंत्र्याची गरज जीवीवस्तूंना वाटत असते. ही गरज उत्पन्न होते तेव्हा शरीरव्यवस्थेच्या विघटनास प्रारंभ होतो. ( Disintegration ), उदा., खेकडयाच्या जातीच्या प्राण्याचे शरीर पुष्ट झाले व मूळ कवचात मावेनासे झाले की कवच मरून, गळून पडते व मूळ कवचाच्या आत दुसरे नवीन मोठया शरीराला साजेसे कवच निर्माण होते. साप कात टाकतो त्याचेही कारण हेच आहे. जादा आकाराच्या शरीराची गरज निर्माण झाल्याने मूळचे कोते शरीर झटकून देणे भाग असते. मूळचे शरीर टाकले नाही तर तो जीवच आपल्या आत कोंडून मरून जातो. ह्या घडामोडीत शरीर मोडते, तुटते, फुटते. परंतु त्यातच त्याचे जीवितरक्षण आहे. ते मोडतेफुटते ना तर मरून गेले असते. कदाचित जीव मेला नसता परंतु त्याचा विकास खुंटला असता. तात्पर्य, संकुल व्यक्तिमत्वासाठी, विकासासाठी प्रारंभिक विघटन आवश्यक आहे. प्रारंभिक विघटन व उच्च स्तरावरील नवरचनासंघटन ह्या दोन प्रक्रियांच्या मधील काळ त्या जीवाच्या आयुष्यातील फार नाजुक काळ असतो. कारण या वेळी त्या जीवीवस्तूला ( Organism ) जर पुरेसे संरक्षण मिळू शकले नाही तर ती जीवीवस्तू प्राणास मुकेल किंवा तिचे आयुष्य अतिशय धोक्यात येईल. या मध्यंतरीच्या काळात किंवा संक्रमण काळात तिची अवस्था फार नाजुक बनलेली असते.

वर जे निष्कर्ष आपण सजीव वस्तूंच्या बाबतीत काढले तेच जसेच्या तसे स्थिर सामाजिक परंपरा व रूढीव्यवस्था ह्यांना लावता येतील. सामाजिक परंपरा व रूढीव्यवस्थांची अवस्था समाजव्यवस्थाना आधार देणाऱ्या अंतर्गत सांगाड्या-सारखी आहे. बाह्य वातावरणात झालेल्या बदलाना अनुसरून स्वतःमध्ये परिवर्तन घडवू पाहणारी अंतर्गत यंत्रणा समाजव्यवस्थेच्या शरीरातही असते. उदा., कवचवाल्या प्राण्यांचे शरीर आयुष्यातील विशिष्ट कालखंडामध्ये वरच्या कवचाचा त्याग करू पाहते. कारण त्या शरीराला अधिक मोठे व्हायचे असते. म्हणून अधिक मोठया बाह्य कवचाची गरज त्या शरीराला आहे. खेकडा जसा त्याच्या शरीराला अडचणीचे वाटू लागलेले कवच टाकून अधिक मोकळी हालचाल करू देऊ शकणारे मोठे शरीर मिळवितो तशा प्रकारे मानवी समाजव्यवस्थाही करतात. उदा., एका विशिष्ट वयातील ( पौगंडावस्थेतील ) मुलाना त्यांच्या आईवडिलांचे वर्तन, वागणे आवडत नाही. ती आईवडिलावर टीका करावयास प्रवृत्त होतात. मानवी समाजव्यवस्थेमध्ये नेहमी आढळून येणाऱ्या ह्या प्रकाराचे कारण खेकडयाच्या बाबतीत असते तेच आहे. खेकडयाप्रमाणेच मानवी समाजही कुठल्यातरी दिशेने वाढू पाहत असतो. म्हणून त्याला आपले शरीर अवघडल्यासारखे वाटू लागलेले







असते. मुले आपल्या ह्या कृतीत समाज शरीराची वदलाची गुप्त इच्छा व्यक्त करीत असतात. पौगंडावस्थेतील वालके हे त्या समाजयंत्राच्या हातातील जणू काही मध्यस्थ साधन असते.

प्रत्येक नव्या तरुण पिढीला तिच्या पूर्वीच्या पिढीच्या मूल्यांच्या सत्यतेविषयी व उपयुक्ततेविषयी नेहमीच शंका आलेली आहे. जेव्हा त्या पिढीला ही शंका वाटू लागते तेव्हा ती पिढी तिच्या दृष्टीतील नवीन मूल्यासाठी सभोवार पाहू लागते. नवीन आदर्शाचा वेध घेऊ लागते. प्रत्येक मानवी वालक आयुष्यात भिन्नभिन्न शारीरिक स्थित्यंतरातून जात असते आणि शारीरिक स्थित्यंतराप्रमाणेच वेगवेगळया मानसिक स्थित्यंतरातूनही जात असते. ह्या सर्व स्थित्यंतरांचा परिणाम त्याच्या धारणांवर होतो. ह्या मानसिक स्थित्यंतरांची एक पद्धती आहे. उदा.: लहान मुले आई अथवा वडील ह्यांच्याशी मनाने वद्ध असतात. कुमारपणात इतर कुणाशी वद्ध वनतात. प्रौढपणी आणखी एकदा ह्या प्रियवस्तू ती वदलतात. मानसशास्त्रामध्ये ह्यालाच Object–fixation वस्तुवद्धता असे नाव आहे. ( मानसिक वस्तुवद्धता म्हणजे मूर्त वा अमूर्त, सजीव वा निर्जीव वस्तूशी वद्ध राहणे. प्रत्येक स्त्री वा पुरुष सजातीय वा विजातीय व्यक्तीशी मनाने वद्ध होऊ शकतात. अशा प्रकारे जेव्हा ती वद्ध वनतात तेव्हा त्याना त्या–त्या वस्तूवाचून दुसरी गती नसते. इतकी ती त्या वस्तूंच्या आहारी असतात. त्यांच्या मनाच्या सर्व शक्ती त्या वस्तूत जणु गुंतून पडतात. उदा., लहान मुले आई वा वडिलांशी मनाने एकजीव असतात. ती थोडी मोठी झाली की वरोवरीच्या मित्राशी वद्ध वनतात. कधी एखाद्या ध्येयाशी वद्ध वनतात. ( देव, देश, धर्म इत्यादी परंतु जेव्हा कधी माणसे वस्तुवद्ध असतात तेव्हा त्या वस्तूवाचून दुसरे काहीही त्यांना सुचत नाही. ) असो. आपल्या प्रस्तुत चर्चेच्या संदर्भात महत्वाची गोष्ट ही की कशाला ना कशाला वाहून घेण्याची, कशाशी ना कशाशी मनाने एकरूप होण्याची उपजत प्रेरणा मानवी मनात वंशोत्क्रांतीच्या व सांस्कृतिक उत्क्रांतीच्या प्रक्रियेत रुजली आहे. ज्याच्याशी मनाच्या सर्व शक्तीनी वद्ध होतात त्या वस्तू वयानुसार वदलत असतात. पण ही प्रवृत्ती कायम असते. मात्र आयुष्यात पुढे पुढे ह्या प्रवृत्तीची तीव्रता कमी होत जाते. उदा., मुले वयात येत असताना जितक्या तीव्रतेने ती एखाद्या वस्तूच्या वा एखाद्या व्यक्तीच्या प्रेमात पडतात तितक्या तीव्रतेने पुढील वयात ती तसे करू शकत नाहीत. ह्या वयात मुलांची दृष्टी वाहेरील जगाकडे वळू लागलेली असते, आता त्यांना आपली मातापितरे पूर्वीइतकी आदर्श वाटत नाहीत. त्यांच्या उक्तीत व कृतीत त्याना आता फरक दिसू लागतो. त्याना वडील माणसांच्या एकूण जीवनतात्त्वज्ञानाविषयीच संशय येऊ लागतो. ऑस्कर वाईल्ड म्हणतो त्याप्रमाणे, "आई-वडिलावरील प्रेमापासून मुले आयुष्याला प्रारंभ करतात. जेव्हा ती मोठी होतात तेव्हा ती त्यांचे मोल करतात फार क्वचितच ती त्याना क्षमा करतात." मुले

वयात येत असताना त्यांची चिकित्सक बुद्धी जागृत होऊ लागते. वाडवडिलांच्या प्रत्येक आज्ञेचे व मूल्यांचे ती नवमूल्यन करू लागतात. अशा नाजुक परिस्थितीत काही कारणाने मूल्यविषयक त्यांचा हा संशय जर दृढ झाला व संशयित मूल्यांची जागा घेऊ शकतील अशी नवी मूल्ये व नवे आदर्श त्यांच्या आयुष्यात जर येऊ शकले नाहीत तर त्यांची अवस्था मोठी कठीण होते. त्यांची मने भरकटतात. ती मार्गभ्रष्ट होतात. मूल्ये व आदर्श ह्या वस्तूंवरची त्यांची श्रद्धाच कायमची खच्ची होते. आदर्श व ध्येये या गोष्टी त्यांना पूर्णपणे खोटया वाटू लागतात. संपूर्ण भ्रमनिरास झालेली या वयाची मुले हे समाजाचे एक दुर्दैव असते. कारण ही मुले हिंसक बनतात. बेपर्वा बनतात. त्यांच्यापैकी ज्यांना काहीच शिस्त न लागलेली असतात ती सरळसरळ गुन्हेगार बनतात. उन्मार्गगामी होतात. आज गुन्हेगारीच्या प्रमाणात आपल्याला जी वाढ झालेली दिसत आहे त्याला कारण हाच मूल्यांचा ऱ्हास आहे. पारंपरिक मूल्ये व आदर्श एकीकडे संशयात्म ठरत असताना त्यांची जागा घ्यावयास नवी मूल्ये व नवे आदर्श पुढे येऊ शकलेले नाहीत. अशा आदर्शांची ज्या वयाला आत्यंतिक निकड असते त्या वयाला समाज ते देऊ शकलेला नाही.

उत्तम ध्येये व मूल्ये समाजात नसण्याचा दुसरा एक अनिष्ट परिणाम होऊ शकतो. कुमारवय हे एक अतिशय संस्कारक्षम वय आहे. त्या वयात प्रत्येक मुलाला कसल्या ना कसल्या भव्यदिव्य कार्याला वाहून घ्यावेसे तीव्रतेने वाटते. ही त्याची मानसिक व शारीरिक अशी दोन्ही प्रकारची गरज असते. शरीरातील कामग्रंथी ह्याच वेळी कार्यप्रवृत्त झालेल्या असतात. त्यांच्या अंतःस्त्रावामुळे शरीरात प्रचंड बदल घडू लागलेला असतो. मन व कल्पनाशक्ती त्यामुळे अतिशय उत्तेजित बनलेली असतात. कसली तरी चमत्कारिक हुरहूर मनाला सतत लागून राहिलेली असते. काहीतरी नवे मिळवावे, नवे करावे असे एकसारखे मनाला वाटत असते. अशा या नाजुक क्षणी मुले चांगल्या हाती न पडता जर चतुर भाषणबहाद्दर पुढाऱ्यांच्या आकर्षणकचाटयात गवसली तर त्यांच्या आयुष्याचा विचका व्हावयास फारसा अवधी लागत नाही. आधीच त्यांच्या मनाला काहीतरी भव्यदिव्य करावे अशी उत्सुकता लागून राहिलेली असते; अशा वेळी लंब्याचवडया बाता मारणारा, पूर्वजांच्या खऱ्या वा खोटया पराक्रमाच्या व मोठेपणाच्या नावाने अपक्व मनाच्या मुलांच्या आक्रमक भावनेला आवाहन करणारा, खऱ्या वा खोटया शत्रूविरुद्ध द्वेषाची चिथावणी देणारा चलाख भाषणपटु पुढारी मुलांची मने तेव्हाच जिंकू शकतो व त्यास कायमचे विकृत वळण लावू शकतो. किंबहुना स्वतःच्या स्वार्थासाठी अपरिपक्व मनाच्या मुलांच्या श्रद्धाशीलतेचा दुरुपयोग करावयास टपलेले अनेक रंगारी हिटलर समाजात संधीची वाटच पाहत असतात. त्यांना थोडीशी संधी प्राप्त होताच नव्यानेच जागृत होऊ लागलेल्या तरुणांच्या आक्रमक व हिंसक



अनुक्रमणिका



प्रवृत्तीला चिथावणी देऊन त्यांना स्वतःच्या राजकीय स्वार्थासाठी ते सहज राबवू शकतात. या वयात मुलांची चिकित्सक बुद्धी जागृत होऊ लागली असली तरी त्या बुद्धीला सखोल चिंतनाची जोड आलेली नसते. प्रचलित आदर्शाविषयी व मूल्याविषयी शंका व नावड मुलांच्या मनात निर्माण झाली असली तरी भाषणपटु डरकाळीबाज पुढाऱ्यांनी त्यांच्यासमोर ठेवलेल्या नव्या आदर्शांची व मूल्यांची खरी लायकी जोखण्याइतकी बुद्धीची परिपक्वता त्यांच्यात आलेली नसते व याचाच परिणाम होऊन ती भलत्या मार्गाला लागतात. हिंसाचार व अत्याचार करू लागतात. कुठल्यातरी अमूर्त तत्त्वाच्या नावाने बसेस, घरे पेटवू लागतात. दंगल करू लागतात. त्यांच्या जीवनाला एकदा हे वळण लागले की मागाहून कितीही प्रयत्न केला तरी ते बदलता येत नाही. हिंसा, विध्वंस, जाळपोळ, मोडतोड हेच त्यांना पुरुषार्थाचे गमक वाटू लागते. विध्वंसनाबरोबर नवनिर्मिती व मोडतोडी-बरोबर जोड हा खरा पुरुषार्थ आहे याची पुढे त्यांना जाणीवच येत नाही. त्यांच्या मनावर फक्त विध्वंसनाच्या व हिंसेच्या तत्त्वज्ञानाचा तेवढा ठसा राहतो. त्यांची मने व मूल्ये विकृत बनतात. त्यांना जीवनाच्या महत्तेचे खरे भान कधी येत नाही व त्यांचे पुढारीपण करणारे भंपक पुढारी त्यांना ते कधी येऊ देत नाहीत. तरुणांमधील रचनात्मक, निर्मितीवाचक प्रेरणांना प्रोत्साहन देण्याचे ते शक्यतोवर टाळतातच. कारण निर्मितीचा, रचनात्मक कार्याचा आनंद मनुष्याला संतुष्ट बनवितो. त्याला वंचक आश्वासनांच्या मागे धावण्यापासून परावृत्त करतो. कारण हा आनंद आत्मपूर्तीचा आनंद असतो. त्याच्या उलट दुसरीही एक गोष्ट आहे ती ही की ह्या विशिष्ट वयात तरुणांना काहीतरी धाडसी कार्यक्रम हवा असतो. त्यामुळे विध्वंसनासारखा नकारात्मक पण शारीरिक हुरहुरीला चेतावणी देणारा कार्यक्रम त्यांना फार पसंत पडतो.

ह्या विशिष्ट वयात तरुणवर्गाला कसल्या ना कसल्या जनता–कार्यक्रमाला, मोठ्या उद्दिष्टाला ( Cause ) वाहून घ्यावेसे वाटत असते. हे वाटणे केवळ बौद्धिक वाटणे नसते. ते अबोध वाटणे असते. त्यामुळे भपकेबाज कार्यक्रम जर त्यांच्यासमोर ठेवला गेला तर त्याला ही तरुण मुले तावडतोबच बळी पडतात. मग तो कार्यक्रम राष्ट्रोद्धाराचा कार्यक्रम असो, राष्ट्राला स्वतंत्र करण्याचा कार्यक्रम असो वा त्यांच्यातीलच एका गटाचा तथाकथित राष्ट्रघातकी वा दुष्ट गट म्हणून निःपात करण्याचा कार्यक्रम असो. कार्यक्रमाची सुबुद्धता जाणण्या-इतकी प्रगल्भ बुद्धी ह्या वयात तरुण वर्गातील कुणाहीपाशी नसते. त्यांना कसला-तरी निःस्वार्थ दिसणारा कार्यक्रम हवा असतो. तो आढळला की देहभान विसरून ते त्याला वाहून घेतात. ह्या वयोगटातील तरुण मुले कित्येकदा इतक्या क्षुद्र व मूर्खपणाच्या कार्यात व्यग्र झालेली दिसून येतात की त्यांच्या त्या उत्साहाचे कुणासही नवल वाटावे व त्याच्या मनात खेदही निर्माण व्हावा.



अनुक्रमणिका

दुसरीही एक घडामोड ह्या वयात मुलांच्या आयुष्यात घडत असते. मुलांच्या शरीरातील ग्रंथी ह्याच वेळी जोराने कार्यास लागलेल्या असतात. त्या जो स्राव बाहेर टाकतात तो रक्तात मिसळतो. ह्या स्रावाच्या अंगी मेंदूवर एक विशिष्ट प्रकारचा परिणाम करण्याची शक्ती आहे. हा स्राव मेंदूतील कळप करण्याच्या प्रवृत्तीला ( संघभावनेला ) चालना देतो. ही प्रवृत्ती जेव्हा जागृत होते तेव्हा त्या तरुण मुलांना कुठल्यातरी बंदिस्त संघटनेचे सभासद व्हावेसे उत्कटतेने वाटू लागते. ह्या वयात पराक्रमनिदर्शक असे काहीतरी करावे असे जसे तरुण मनाला वाटते, तसेच अभेद्य संघटनात सामील व्हावे असेही त्यांना वाटत असते. चिरेबंदी संघटनेत सामील होऊन कुणातरी पराक्रमी कणखर पुढाऱ्याच्या मार्गदर्शनाखाली प्रचलित जग बदलून टाकावे अशी एक तीव्र इच्छा या वयाच्या मुलांना सारखी अस्वस्थ करीत असते. त्यामुळे जेव्हा असा काही कार्यक्रम पुढे ठेवणारा व आपल्या डरकाळ्यांनी शौर्याचा आभास निर्माण करणारा पुढारी दुर्दैवाने त्यांच्या समोर येतो, तेव्हा वेड्यासारखी ती त्याच्यामागे धावू लागतात. त्याला मोठा पुढारी बनवितात. स्वतःचे आयुष्य धुळीस मिळवितात. ह्या विशिष्ट वयामध्ये स्वीकार-लेल्या ध्येयाची इष्टानिष्टता, सत्यासत्यता व शक्याशक्यता मुलांना कळत देखिल नाही. ह्या वयात त्यांना फक्त एक गोष्ट कळते. ती म्हणजे कसला तरी झेंडा खांद्यांवर घेणे व काहीतरी भव्य, लोकांच्या नजरेत भरेल असे करणे. सर्व जगभर प्रत्येक समाजामध्ये गुंड मुलांच्या ज्या टोळ्या अलीकडे आढळू लागल्या आहेत त्यामागील हे एक महत्त्वाचे कारण आहे.

मनुष्य आयुष्यातील भिन्नभिन्न पर्वात भिन्नभिन्न वस्तूंशी बद्ध होत असला तरी उत्कटतेचाच फक्त विचार केला तर पौगंडावस्थेतील वस्तुबद्धपणाची बरोबरी इतर कुठल्याही पर्वातील वस्तुबद्धतेशी होऊ शकत नाही. या पर्वातील वस्तुबद्धता फारच तीव्र असते, पुढील आयुष्यात इतक्या उत्कटतेने, देहभान विसरून आपण कधीच कशाला वाहून घेऊ शकत नाही. या वेळचा आपला आवेशही पुढील आयुष्यातील आवेशाच्या तुलनेत अतिशय कडवा असतो. पुढील आयुष्यात आपण बरेचसे व्यवहारी बनलेले असतो. तोलूनमापून जगावयास शिकलेले असतो. स्वतःला विसरून काही करणे आम्हाला नंतर शक्य होत नाही. पौगंडावस्थेच्या काळात आपल्या विचारात व भावनात एक आदिम उत्कटता असल्याने ह्या वयात ज्या कल्पना व आदर्श आपल्या मनावर परिणाम करून जातात ते पुढे कधीही पुसले जात नाही. अवेशपरूपाने आयुष्यभर आपल्या वर्तनाचे मार्गदर्शन ते करीत असतात. पौगंडावस्थेचा काळ हा एकूण मानवी मनाच्या व शरीराच्या दृष्टीने उलथापालथींचा काळ असतो; संघर्षाचा काळ असतो. त्यातल्या त्यात जी मुले मुळातच थोडी अधिक संवेदनक्षम असतात त्यांना तर हा काळ फारच कसोटीचा जातो. परंतु असे असले तरी जगाचे तारकपुरुषसुद्धा याच मुलातून जन्मास येत



अनुक्रमणिका



असतात. कारण समस्या जितकी बिकट तितके त्या समस्येतून तावून सुलाखून बाहेर पडणारे व्यक्तिमत्वही अधिक तेजस्वी असा मानसशास्त्राचा नियमच आहे.

वंशउत्क्रांतीच्या अथवा प्रजातीजननाच्या प्रक्रियेत सहजप्रवृत्तीसदृश कित्येक वर्तनप्रकार मनुष्यसमूहांच्या अंगवळणी पडलेले असतात. विशिष्ट प्रकारच्या चेतावणीमुळें जशी विशिष्ट प्रकारची सहजप्रवृत्ती जागृत होते तशाच प्रकारे हेही वर्तनप्रकार कार्य करीत असतात. जोवर अशी चेतावणी वा चेतक परिस्थिती उपस्थित नसते तोवर हे वर्तनप्रकार सुप्त राहतात. पौगंडावस्थेत मुलांच्याबाबतीत घडणाऱ्या वस्तुबद्धतेच्या क्रियेला ह्या संदर्भात एक महत्वाचे अंग आहे. दुय्यम सहजप्रवृत्तींना दिशा देण्याचे कार्य वस्तुबद्धतेची क्रिया करते. आपण मागे पाहिले की वंशउत्क्रांतीमध्ये काही एक प्रतिक्रियातत्मक वर्तने आपल्या शरीरामध्ये तयार झालेली असतात. उदा., आपले कुटुंबीय, आपली स्नेहीमंडळी, आपले जातभाई ह्यांच्यावर काही संकट कोसळले अथवा त्यांना काही धक्का लागण्यासारखी परिस्थिती निर्माण झाली, तर आपली झुंजारवृत्ती जागृत होऊन त्यांची कड घ्यावयास आपण तयार होतो. आता ही जी प्रवृत्ती आहे ती मनुष्यजातीची उपजत प्रवृत्ती नव्हे. ती वंशउत्क्रांतीत निर्माण झालेली प्रवृत्ती आहे. परंतु जरी ही प्रवृत्ती उपजत नसली व मागाहून तयार झाली असली तरी त्या प्रवृत्तीच्या कार्यप्रवणतेला जो उत्साह व जी शक्ती लागते तो उत्साह व शक्ती इतर सहज-प्रेरणांप्रमाणेच ह्या दुय्यम प्रेरणातून मिळते. यालाच आपण प्रतिकारप्रवृत्ती अथवा झुंजारवृत्ती, कडवा आवेश असे नाव दिले आहे. ही प्रवृत्ती जागृत व्हावी अशी परिस्थिती निर्माण होताच शरीराचे इतर व्यापार आपोआप थांबविले जाऊन सर्व शक्ती त्या परिस्थितीला प्रतिकार करण्यासाठी एकवटित होते हे आपण अनेकदा पाहिलेले व अनुभविलेले आहे. उदा., आपण जी धार्मिक मते पवित्र मानतो त्यांच्यावर कोणी उणी टीका केली की लगेच आपला संताप जागृत होऊन आपण त्या इसमाचा प्रतिकार करावयास सज्ज होतो. याचे कारण परंपरेत अशा प्रकारची सुप्त प्रेरणा आपणामध्ये तयार झालेली आहे. ही प्रेरणा तत्काळ तसे करावयास आपणास भाग पाडते. आपल्या धार्मिक मतांवर जर आपला केवळ वैचारिकच विश्वास असता तर आपल्या मतांवर कोणी आघात केला म्हणून आपला क्रोध अशा प्रकारे जागृत झाला नसता. धार्मिक मते ही केवळ वैचारिक मतेच असती तर आपण बौद्धिक वाद घातला असता. परंतु या व अशाच प्रकारच्या अनेक बाबींच्या बाबतीत असे होत नाही. तर त्या बाबींच्या बाबतोत आपली प्रतिक्रिया आकस्मिक, अबौद्धिक व शारीरिक प्रकारची असते.

( कडवा आवेश Enthusiasm ) हा शब्द Enthousiasmos ह्या ग्रीक शब्दावरून निघाला आहे. ह्या शब्दाचा मूळ अर्थ अंगात येणे, असा आहे. अंगात आले की माणसे कसे वागतात ते आपणापैकी अनेकांनी पाहिले असेल. अशा वेळी



अनुक्रमणिका

त्या व्यक्तीवर विचाराचा अंमल विलकूल राहत नाही. ती विकाराच्या आधीन झालेली असते. लहान मूल बेफाम वागू लागले की आपण त्याला म्हलतो देखिल की ‘ काय, तुझ्या अंगात कोणी आले की काय ? ’ अंगात आले म्हणजे माणसे अशीच बेफाम बनतात. एरवी अशक्य वाटणाऱ्या गोष्टीही करून दाखवितात. कारण ह्या वेळी त्यांच्यावर त्यांच्या बुद्धीचा विलकूल पगडा नसतो. सामाजिक परंपरा व रूढी ह्यांना ह्याच प्रकारच्या झुंजार आवेशाचा पाठिंबा असतो. परंतु ह्या प्रकारच्या वर्तनात बुद्धीचा अभाव असल्याने हे वर्तन कित्येक प्रसंगी अतिरेकी व विध्वंसक बनण्याचीही शक्यता असते. )

प्रत्यक्ष परिणाम पाहिल्यास कडवा आवेश आक्रमक प्रवृत्तीसारखाच असतो. आक्रमक प्रवृत्तीत आढळणारा हाणा, मारा, ठोका हाच प्रकार येथेही आढळतो. अर्थात आक्रमक हिंसक प्रवृत्तीचा उद्देश व्यक्तिगत स्वार्थासाठीही होताना आढळतो. तसा स्वार्थासाठी होणारा उद्रेक कडव्या आवेशात आढळत नाही. उदा., कुणाचे पैसे लुबाडायचे आहेत ह्या इच्छेसाठी हिंसा केली जाते. हा हिंसेचा स्वार्थी प्रकार झाला. परंतु आपल्या धर्मावर आक्रमण होत आहे किंवा होणार आहे या विचाराखाली जेव्हा माणसे परस्परांचा गळा कापावयास तयार होतात तेव्हा तो नुसता आक्रमकपणा नसतो, तर ह्या आक्रमकपणाच्या मागे एका खऱ्या वा खोट्या तत्त्वाचे अधिष्ठान असते; एका तत्त्वाच्या नावाने ती माणसे तसे वागू पाहत असतात. अर्थात मनुष्यांनी तसे करू नये ही गोष्ट उघडच आहे.

मनुष्याचा कडवा आवेश जेव्हा जागृत होतो तेव्हा त्याच्या शरीरात होणारे बदल अभ्यासण्यासारखे असतात. उदा., त्या मनुष्याच्या मेरुदंडातून एक प्रकारची उष्णतेची लाट वर वर जाऊन मस्तकात शिरू पाहते. त्याचे बाहू स्फुरू लागतात. श्वासोच्छ्वास जोराने होऊ लागतो. अंगावरचे केस ताठ उभे राहू लागतात. रोजच्या व्यक्तिमत्वाचा त्या मनुष्याला विसर पडतो. एवढेच नव्हे तर रोजचा आपला स्वभावही तो मनुष्य विसरतो. त्याच्या अंगात कसला तरी वेगळाच संचार होतो. त्याच्या डोळ्यात रक्त उतरू लागते. त्याला त्याच्या समोरच्या गोष्टी व्यतिरिक्त इतर काहीही दिसेनासे होते. या प्रसंगी तो नातेगोतेही विसरतो. ज्याच्यासाठी त्याच्या कडवा आवेश उत्तेजित झालेला असतो त्याव्यतिरिक्त काहीही त्याच्या हिशेबी अस्तित्वात नसते. यातील बरेचसे बदल आक्रमक प्रवृत्तीच्या लक्षणांशी जुळणारे आहेत.

कडवा आवेश जागृत झालेल्या इसमाला त्या क्षणी त्याचे जे कर्तव्य वाटत असते त्याव्यतिरिक्त इतर सर्व दिसेनासे होते असे म्हटले तर ते चुकीचे होणार नाही. कर्तव्याच्या नावाखाली अशा प्रसंगी आपल्या जातभाईंची नव्हे बायको-मुलांची वा इतर नातेवाईकांची हत्या करावयास मनुष्य तयार झालेला आहे. कडव्या आवेशाच्या आहारी गेलेल्या इसमाला त्याच्या स्वीकृत कर्तव्याखेरीज



अनुक्रमणिका



इतर सर्व गोष्टींचा, त्यात सांस्कृतिक निषेधही आले, पूर्णपणे विसर पडतो. ही मनुष्ये अशा प्रसंगी कोणताही हिंसाचार वा विध्वंसक कृत्ये करावयास मागे पाहत नाहीत. कारण सामाजिक लज्जा हा प्रकार त्यांच्या बाबतीत आता अस्तित्वातच नसतो. उलट आपण काहीतरी महत्कृत्य करीत आहोत असेच स्फुरण त्यांना चढलेले असते. या प्रसंगी बौद्धिक युक्तिवादाचा तर त्यांच्या बाबतीत काहीच उपयोग नसतो. कारण बुद्धीचे शब्द त्यांच्या मेंदूपर्यंत पोचत नाहीत. अशा प्रसंगी मोठमोठ्या जीवनमूल्यांचाही काही प्रभाव चालत नाही. तीही पार उध्वस्त होऊन जातात. अनेक वर्षे हृदयाशी जोपासलेली मूल्ये एका क्षणात पायाखाली फेकली जातात नि नवी मूल्ये कवटाळली जातात. विचार आणि नैतिक जबाबदारीची जाणीव ह्या दोन्हीही गोष्टींचा या क्षणी पूर्ण लोप झालेला असतो. ह्या प्रसंगाला उद्देशून युक्रेनियन भाषेत एक म्हणच आहे. युक्रेनियन लोक म्हणतात की, " झेंड्याची काठी एकदा खांद्यावर चढली की मनुष्याची सगळी अक्कल तुतारीच्या नळकांड्यावर ठरते. "

सर्वसामान्य आक्रमक प्रवृत्ती आणि मनुष्यजातीतील कडवा आवेश ह्यात बरेच रचनात्मक साम्य आहे. त्यातील परिणामांचे साम्य तर वर आपण पाहिलेच. सामान्य आक्रमकपणाच्या आहारी गेलेला इसम जशा प्रकारची हिंसक कृत्ये करू शकतो त्याच प्रकारची कृत्ये कडव्या आवेशाने उत्तेजित झालेला इसमही करतो. दुसरे साम्य शरीरात होणाऱ्या बदलांचे. ह्याही बदलात तेच साम्य दिसून येते. कडवा आवेश जागृत होऊन मनुष्य प्रतिकारसज्ज बनला की त्याच्या शरीरात पुढील बदल होतात. त्याचे स्नायू ताठर बनतात; रक्त डोक्याकडे धाव घेऊ लागते; केस ताठ उभे राहतात; डोळे तांबरतात; बाहूंना स्फुरण चढू लागते; ते शरीरापासून विलग होतात; मुठी वळतात; चेहरा वर उचलला जातो. थोडक्यात, देमार चित्रपटातील नायकासारखा चेहरा दिसू लागतो.

अगदी अशीच लक्षणे कळपाचे वा कुटुंबाचे रक्षण करावयास उभ्या ठाकलेल्या चिंपांझी वानरात दिसतात. चिंपांझी वानर त्याच्या मुलामाणसांच्या रक्षणासाठी उभा ठाकलेला असतो. मनुष्य त्याने आदर्श मानलेल्या रूढींच्या व परंपरांच्या रक्षणासाठी. दोघांची प्रतिक्रिया एकच आहे. फरक आहे तो उद्दिष्टांच्या स्वरूपात एक मूर्त वस्तूसाठी ती प्रतिक्रिया दाखवीत असतो; दुसरा अमूर्त कल्पनांसाठी. वानराचा प्रत्यक्ष स्वार्थ आपण पाहू शकत असल्याने वानराच्या वागण्याला आपण कमी लेखतो. मनुष्य काही अमूर्त, आध्यात्मिक बाबींसाठी तसा वागत असल्याने त्याच्या वागण्याला आपण उदात्त म्हणतो. वस्तुत: दोन्हीही वागणी एकाच प्रकारची आहेत. आक्रमकता हीच दोहोंचीही प्रकृती आहे. जीवशास्त्रही तसेच मानते. आक्रमकपणाच्या एकाच मूलभूत प्रवृत्तीतून ही दोन्हीही निपजली आहेत. मानवाच्या मानवपूर्व पूर्वजाच्या वर्तनातून हा आवेश-



अनुक्रमणिका



युक्त बाणा निघाला असावा; एवढेच नव्हे तर आदिम काळात मानव जेव्हा छोटे-छोटे कळप करून राहात असे तेव्हा त्याला हा बाणा फारच उपयोगी ठरला असावा. आवेशयुक्त व अधिक विचार न करणारी ही एकठाक प्रेरणा त्या काळात एकूण कळपाच्या फायद्याच्या दृष्टीने निश्चितच उपकारक ठरली असणार. त्या काळातील जीवन इतके धकाधकीचे होते की, आपली इतर कर्तव्ये विसरून एकचित्ताने कळपाच्या रक्षणासाठी प्रत्येक पुरुष घटकाने उभे राहणे हे तेव्हा आत्यंतिक आवश्यकच होते. 'आधी माझी जात' ही वृत्ती तेव्हा हवीच होती.

संस्कृतीच्या प्रसाराबरोबर कडव्या आवेशाच्या स्फूर्तिविषयात बदल घडून आला आहे. पूर्वी कळप व कुटुंब हा तो विषय होता. पुढे कळपाच्या समजुती व रूढी तो विषय बनल्या. कारण ह्या समान समजुतीमुळे व रूढींमुळे तो समाज संघटित राहत होता. त्या रूढी व समजुती हे त्यांच्या एकतेचे प्रतीक होते. जो आवेश कळपासाठी पूर्वी काम करीत असे तो आता एकतेच्या ह्या प्रतीकचिन्हां-साठी काम करू लागला. प्रतिक्षिप्त क्रियेच्या कायद्याप्रमाणे ( परतपरत एकच क्रिया व एकच प्रतिक्रिया घडत गेल्याने ) व पिढ्यान्‌पिढ्या एकच अपरिवर्तनीय ठसा मनावर उमटत गेल्याने तसे पाहिले तर अमूर्त मूल्ये प्रत्येक समाजात स्थिर होत गेली होती. फार फार मागे जातभाईंच्या रक्षणासाठी प्रत्येक पुरुष घटक पेटून उठत असे; आता ह्या सामूहिक एकता प्रतिकचिन्हांसाठी ( राष्ट्रध्वज. जमातीच्या परंपरा, रूढी, समजुती, मानबिंदू इत्यादि ) भांडू लागला.

समूर्त कारणांसाठी ( प्रत्यक्ष हाडामांसाची माणसे, जनावरे इत्यादि ) जेव्हा मनुष्याचा कडवा आवेश जागृत होत होता तेव्हा त्यातील धोका फारच कमी प्रमाणात होता. परंतु जेव्हा कडवा आवेश जागृत होण्याची प्रतिक्षिप्त क्रिया अमूर्त बाबींसाठीही काम करू लागली तेव्हा ह्या प्रवृत्तीमधील धोका अनेक पटींनी वाढला. हाडामांसाची मनुष्ये समोर डोळ्यांना दिसत असतात. त्यामुळे त्यांच्यावर होत असलेल्या अत्याचाराचे परिमार्जन झाले वा त्या अत्याचाराचा सूड घेतला गेला की जागृत झालेला कडवा आवेश ओसरण्याची शक्यता असे. परंतु आता एक वेगळीच गोष्ट घडत होती. आवेश समूर्त कारणांऐवजी अमूर्त कल्पनांसाठीही जागृत होऊ शकत असल्याने त्याची व्याप्ती व धोका वाढली होती. त्यातून अमानुषता जन्माला येण्याची शक्यता निर्माण झाली होती. अमूर्त कारणां-साठी कडवा आवेश जागृत होण्याच्या व करता येण्याच्या क्रियेतील सुप्त धोका हा आहे. कारण संताप कुठे थांबवायचा हेच त्या ठिकाणी निश्चित नाही. संताप आणणाऱ्या गोष्टींचा विचार जितका अधिक करावा तितकी संतापाची तीव्रता वाढावी असे ह्या ठिकाणी घडत जाते. जिवंत मनुष्ये विसरून अमूर्त कल्पनांसाठी प्राण देण्याच्या गोष्टी मनुष्य करू लागला की त्याच्या हातून काय होईल हे सांगता येत नाही. त्याच्या हातून कदाचित चांगले होईल किंवा कदाचित



अनुक्रमणिका



कल्पनातीत वाईटही होईल. त्याच्या त्या आवेशाला कोठले वळण मिळते ह्यावर हे सर्व अवलंबून असते. हे वळण चांगले मिळेल ह्याची हमी केव्हाच देता देण्यासारखी नसते.

अमूर्त कल्पनांसाठी कडवा आवेश जागृत करता येण्याच्या परिस्थितीचा परिणाम दोन प्रकारचा होऊ शकतो. उदा., हा आवेश मानवतावादी ध्येयांच्या बाजूने जागृत करता येईल किंवा स्वार्थी महत्त्वाकांक्षांच्या बाजूनेही जागृत करता येईल. चतुर परंतु बदमाष जनतापुढारी ह्या परिस्थितीचा गैरफायदा नेहमी उठवीत असतात. हे लोक चतुर व भावना उत्तेजित करणारी भाषणे करून मानवजातीमध्ये फूट पाडू शकतात. त्याउलट लोकहितदक्ष व निःस्वार्थ पुढारी मानवतेच्या बाजूने लोकात एकजूट घडवू शकतात. लोकातील द्वेष, मत्सर, सूडभावना आदि नीच प्रकारच्या भावनांना पहिल्या प्रकारच्या पुढाऱ्यांचे आवाहन असते; तर प्रेम, भूतदया, शांतीसारख्या उदात्त भावनांना दुसऱ्या प्रकारचे पुढारी आवाहन करतात. आवेशयुक्त बाण्याने शास्त्र, कला, मानवजातीची सेवा अशासारख्या कार्यांना जर अनेकांनी स्वतःला वाहून घेतले नसते तर मानवजातीची आज दिसते ती प्रगती दिसलीच नसती. ह्या सर्व प्रगतीमागील मुख्य घटक निर्धारयुक्त झुंजारबाणा हाच आहे. या प्रकारची जिद्द, चिकाटी व आवेश जर मानवजातीने दाखविली नसती तर तिच्या बाबतीत काहीच चांगले घडू शकले नसते. तेव्हा ह्या सुप्त आवेशाच्या बाबतीत खरा प्रश्न हा असतो की हा आवेश फक्त चांगल्याच कार्यासाठी कसा राबविता येईल ? हा आवेश मानवजातीच्या उन्नतीसाठी खर्च करायचा, की महायुद्धांसारख्या विनाशकारक मूर्खपणासाठी खर्च करायचा ? ह्या प्रश्नाच्या उत्तरावर मानवजातीचे पुढील भवितव्य अवलंबून आहे.

मनुष्यातील कडव्या आवेशाला कशा प्रकारचे वळण लागायचे ही गोष्ट त्याच्या संस्कारक्षम वयात त्याच्यावर कोणते संस्कार होतात, कोणत्या प्रकारचे विचार त्याच्या मनावर बिंबविले जातात ह्यावर अवलंबून आहे. मुलांचे मन ज्या प्रकारे तयार केले जाते त्या प्रकारची प्रतिक्रिया पुढील आयुष्यात ती दाखवितात. आपल्या उपजत प्रवृत्ती फार ताकदवान असल्या तरी नैतिक जबाबदारीची आपली जाणीव जर खरोखर तीव्र असली तर त्या उपजत प्रेरणांवरही आपण मात करू शकतो. कडवा आवेश हीदेखिल इतर प्रेरणांसारखीच एक प्रेरणा आहे. दुय्यम प्रकारची, पण प्रेरणाच ! वंशजननाच्या प्रक्रियेत एका विशिष्ट प्रकारचे कार्य ती शिकली आहे. म्हणून काही एका विशिष्ट पण उत्तम व लोकहितवादी मूल्यांच्या बाजूने कार्य करावयास जर आपण तीस शिकवू शकलो तर तिजपासून मानवजातीचा बराच फायदा आपण करून घेवबू शकू व त्या प्रेरणेचे अपपरिणाम आपण टाळू शकू. बालपणी एका विशिष्ट वयात सर्वसाधारण सर्वच मुले ध्येया-

साठी आतुर असतात. अशा वयात त्यांना जर आपण मानवतावादी ध्येये पुरवू शकलो तर ती वहकणार तरी नाहीत. त्यांच्या आवेशाला चांगले वळण लागेल.

कडवा आवेश ही एक बलवान प्रेरणा आहे तशीच ती एक स्वतंत्र प्रेरणाही आहे. लैंगिक प्रेरणेसारखी वा आत्मरक्षणाच्या प्रेरणेसारखीच ह्या प्रेरणेची स्वत:ची अशी वेगळी भूक आहे. तसेच तिची स्वत:ची अशी स्वतंत्र अंतर्गत यंत्रणा आहे. लैंगिक प्रेरणेसारख्या इतर उपजत प्रेरणा त्यांचे कार्य होताच जशा आत्मसमाधान पावतात तशीच ह्याही प्रेरणेची गरज असते. लैंगिक प्रेरणेप्रमाणेच हीही प्रेरणा विकारी व अबौद्धिक आहे. ही प्रेरणा एकदा जागृत झाली म्हणजे चिकित्सक बुद्धीचा तावा तिजवर चालत नाही. कामातुर मनुष्य जसा बेफाम बनतो तसाच आवेशाने चेकाळलेला मनुष्यही बेफाम बनतो. धर्मांचा वा राजकीय तत्त्वप्रणालीचा प्रश्न आला की मी मी म्हणणारे लोकही अविचारी वागताना आपण नेहमी पाहतोच! हंसांच्या 'विजयललकारीचा' अबोध परिणाम ज्याप्रमाणे कळपातील सर्वच्यासर्व हंसांच्या मनोवृत्तीवर होतो व जसे ते लढयाला उत्सुक होतात, तशाच प्रकारे मनुष्यातील आक्रमक ललकारीचा परिणामही तिथे हजर असणाऱ्या सर्वांच्या मनोवृत्तीवर होत असतो व ते सूडाने व तत्सम भावनेने पेटू लागतात. मानवजात विविध मतप्रणालींच्या राजकीय पक्षांमध्ये विभागली गेली असल्यामुळे एकमेकांशी आवेशपूर्ण क्रौर्याने झगडत नसून आवेशपूर्ण कडवे-पणाच्या अस्तित्वामुळे ती तशी विविध पक्षात विभागली गेली आहे. हे पक्ष तिच्या कडव्या आवेशाला वाट करून देतात.

कडव्या आवेशाला वळण लावता येते हे एकदा मान्य केले की मग महत्त्वाची गोष्ट उरते ती ह्या आवेशावर तावा कसा मिळवायचा ही. हा तावा मिळविणे ही एकूण अखिल मानवजातीच्या हिताच्या दृष्टीने प्रमुख महत्त्वाची गोष्ट आहे. आता खरी गोष्ट अशी आहे की कुठल्या प्रकारच्या परिस्थितीत ही कडवी प्रेरणा उत्तेजित होते हे आपण शोधून काढू शकलो तर ह्या प्रेरणेबरोबरच्या लढयातील अर्धी लढाई आपण जिंकल्यासारखे असते. कारण काय घडते, केव्हा घडते हे एकदा ध्यानात आले की काय घडू नये व कसे घडू नये ह्याच्यासाठी प्रयत्न करता येणे अगदी शक्य असते. कडवा आवेश केवळ खऱ्या व्यक्तिसाठी वा व्यक्ति-समूहासाठी जागृत होतो असे नाही तर अमूर्त कल्पनांसाठी तितक्याच प्रखरपणे जागृत होऊ शकतो. याचाच अर्थ प्रतीकात्मक चिन्हांसाठीही तो जागृत होऊ शकतो. उदा., आपले मित्र, सगेसोयरे, जातभाई ह्यांच्यावर अत्याचार होत असलेला पाहिल्याने जसा हा आवेश जागृत होऊ शकतो, तशाच प्रकारे आपला, आपल्या कुटुंबाचा, आपल्या जमातीचा वा राष्ट्राचा मानबिंदू असणाऱ्या गोष्टींचा अपमान होण्याची शक्यता निर्माण झाली तरीही हा आवेश जागृत होऊ शकतो. ह्याचाच अर्थ ही प्रेरणा उद्दीपित करणारे चालक तत्त्व समूर्त वस्तू असेल अथवा

संकल्पनासारखी अमूर्त वस्तूही असेल. समूर्त वस्तू व अमूर्त प्रतिकात्मक चिन्हे ह्या दोहोत मानवजातीच्या कल्याणाच्या दृष्टीने अमूर्त प्रतीकात्मक चिन्हे ही अर्थातच अधिक महत्त्वाची बाव आहे. कारण अमूर्त हेतू अनेक प्रकारचे असू शकतात. किंवहुना छां छूं, जंतरमंतर करून कुठल्याही प्रकारच्या कृतीला उत्तेजक हेतू बनविता येतो. खेळांचे सामने, राष्ट्राचा मान, विक्षिप्त लोकाचार, खोटा जातवाद वा प्रांतवाद ह्यांच्यापासून तो तहत शास्त्रीय सत्य, वैचारिक तत्त्वप्रणाली, कलात्मक पंथ ह्यांच्यापर्यंत कुणाच्याही बाजूने हा आवेश जागृत करता येतो. फक्त एका विशिष्ट प्रकारे विशिष्ट भावनांना आवाहन केले की पुरे.

कडवा आवेश ज्याच्याकरिता जागृत होऊ शकतो अशी ही एक प्रकारची परिस्थिती. दुसऱ्याही एक प्रकारच्या परिस्थितीत हा आवेश जागृत करता येतो. ही परिस्थिती म्हणजे मानवी मूल्यांच्या वतीनेही आवेशाची प्रतिक्रिया जागृत करता येते. आता मूल्ये अनेक प्रकारची असू शकतात किंवा कुठल्याही वस्तूला मूल्य वनविता येणे शक्य आहे. त्यामुळे मानवसमूह ज्यांना ' मूल्य ' समजतात अशा वस्तूंना खरा वा खोटा धोका निर्माण झाला असताही मानवाचा कडवा आवेश उत्तेजित होऊ शकतो. म्हणजेच असा धोका निर्माण करू शकणाऱ्या शत्रूच्या खऱ्या वा खोटया अस्तित्वामुळेही हा आवेश जागृत करता येणे शक्य आहे. उदा., गाय हे हिंदूंचे दैवत म्हणजे मानचिन्ह मानले जाते. त्याउलट मुसलमान गोमांसभक्षक असतात. अशा परिस्थितीत हिंदूंचा मुसलमानांकडे पाहण्याचा दृष्टीकोन नेहमीच संशयाचा असेल. सभोवताली मुसलमानांची वस्ती असणे ही गोष्ट हिंदूंच्या बावतीत नेहमीच सुप्त स्फोटक परिस्थितीची असेल. गाय मारल्याच्या निव्वळ खोटया अफवामुळेही हिंदूमुसलमानात दंगली उसळल्या आहेत. तेव्हा मुसलमान शेजारी आहेत ह्याचा अर्थ हिंदूंच्या कडव्या आवेशाला उत्तेजित करू शकणारी एक बाब शेजारी आहे. आता मुसलमान हा अशा प्रकारचा एक शत्रू आहे ही एक काल्पनिकही बाव असू शकेल. कारण हिंदूंच्या भावना न दुखाविण्याचे मुसलमानांनी ठरविले असण्याची शक्यता असेल. परंतु जरी तसे असले तरी हिंदूंची आवेशयुक्त धारणा अस्तित्वातून जाऊ शकत नाही. कारण ती शेकडो वर्षांची धारणा आहे. तेव्हा जोपर्यंत मनुष्यांच्या एका समाजाला स्वतःच्या मानचिन्हांविषयी दुसऱ्या समाजाची प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष वा काल्पनिक भीती वाटत आहे तोपर्यंत कडवा आवेश केव्हा ना केव्हा जागृत होण्याची शक्यता राहतेच. उदा., जोपर्यंत हा ज्यू आहे, तो मुसलमान, हा कम्युनिस्ट आहे, तो भांडवलशाहीवाला आहे अशा प्रकारचे शत्रुत्ववाचक समज मानवजातीत आहेत तोपर्यंत विनाशकारी कडवा आवेशही असणार आहे. तेव्हा हा किंवा तो माझा शत्रू आहे ही भावना कायम असेस्तवर कडव्या आवेशाचा स्फोट घडविणारी चेतकस्थिती आहे असेच म्हणावे लागते. हा शत्रू वर आपण पाहिले त्याप्रमाणे प्रत्यक्ष देहधारीच

असावयास हवा असे नाही; तत्त्वप्रणाली, समज इत्यादींच्या रूपातील अमूर्त संकल्पनाही ते कार्य करू शकतात.

कडवा आवेश हमखास जागृत करू शकणारा तिसरा घटक म्हणजे प्रोत्साहक पुढारी-चित्र ह्या बाबतीत पुढारी जी हानी करू शकतात त्याच्याशी इतर कसलीही तुलना होऊ शकणार नाही. शिवसेनेचा नुकताच होऊन गेलेला इतिहास ह्या बाबतीत अगदी बोलका आहे. महाराष्ट्रातील तरुणवर्गाच्या मनात स्वतःच्या अगतिकपणाविषयीचा तीव्र असंतोष अनेक दिवस धुमसत होता; तरी शिवसेनेचे सेनापती त्याला विशिष्ट दिशा देईपर्यंत त्या असंतोषाचा व आत्मद्वेषाचा स्फोट झाला नव्हता. ह्या असंतोषजनक परिस्थितीच्या मूर्त कारणाचा नामनिर्देश प्रथम शिवसेना-सेनापतींनी केला. म्हणजेच मराठी तरुणवर्गाला त्यांच्या दुर्दैवाला कारणीभूत असणाऱ्या शत्रूचे नाव सेनापतींनी सांगितले व त्यांच्या संतापाला वाट करून दिली. अर्थात ह्या शत्रूने आपले रूप वारंवार पालटले आहे. प्रथम मद्रासी भाषा बोलणारा दाक्षिणात्य हा शत्रू होता; नंतर लाल बावटेवाला कम्युनिस्ट तो शत्रू झाला. कधी सरकारच तो शत्रू होता. पण शत्रूच्या बुजगावण्याच्या मदतीने मराठी तरुणवर्गाला ( फक्त मुंबईतल्याच ) दावणीला बांधल्यासारखे बांधून त्यांनी ठेवले आहे. सांगायचा मुद्दा असा की कडवा आवेश रक्तात भिनलेला असला तरी स्फूर्तिदाता पुढारी नसल्यास चालण्यासारखे नसते. स्वतःला फॅसिस्टवृत्ती विरोधी म्हणवून घेणाऱ्या लोकशाहीवादी राष्ट्रांचेही पुढारी-प्रतिमेवाचून चालत नसेल. चालले असते तर पुढाऱ्यांचे प्रचंड फोटो जागा सापडेल तिथे चिकटविले गेले नसते. मात्र सुदैवाची गोष्ट ही आहे की एकाच प्रकारच्या पुढारी-प्रतिमेला लोक आकर्षित होत नाहीत. कुणाला हिटलर-नमुन्याचा पुढारी आवडतो, कुणाला चार्लस् डार्विन किंवा आइन्स्टिन नमुन्याचा संशोधक पुढारी आवडतो.

कडवा आवेश उद्दीपित करणाऱ्या घटकात पुढारी-प्रतिमेला अशा प्रकारे बरेच महत्त्व आहे. ही प्रतीमा जनतेच्या कल्पनाशक्तीला उत्तेजित करू शकते; त्यांच्या भावना संघटित करू शकते व अशा प्रकारे त्यांच्या अबोध मनावर सत्ता गाजवू शकते. प्रत्येक देशात, मग तो कट्टर लोकशाहीवादी असो अथवा कट्टर हुकूमशाहीवादी असो, तेथील प्रबल पुढारी येनकेन प्रकारेण आपली छबी लोकांच्या कल्पनाशक्तीवर उमटेल असे पाहत असतो. वंशजननाच्या कार्यक्रमात पुढारी हवा ही भावना मानवजातीच्या भावनेवर व मेंदूवर कोरली गेली असली, तरी अमक्याच प्रकारच्या पुढाऱ्याला जनता अनुकूल प्रतिक्रिया दाखवील हा भाग कोरला जात नाही. वंशजननाच्या घडामोडीत पुढारी-संस्थेची गरज जरी मनुष्यजातीच्या मनात निर्माण झालेली असली तर ती पुढारी-प्रतिमा घट्ट व अपरिवर्तनीय नाही. ती बदलती, गतीशील प्रतिमा आहे. तेव्हा एका विशिष्ट



अनुक्रमणिका

परिस्थितीत लोक गांधीजींसारख्या पुढाऱ्याच्या मागे जातील; दुसऱ्या परिस्थितीत हिटलर किंवा अतिहिटलरांच्या मागे जातील. कडव्या आवेशाच्या रूपातील दारूचा सुप्त साठा जनतेच्या मनात नेहमीच हजर असतो. तो पेटण्यासाठी अग्नीची ठिणगी हवी असते. पुढारी ती पुरवितात.

कडव्या आवेशाचा स्फोट होण्यासाठी आवश्यक असणारा चवथा घटक म्हणजे एकाच भावनेने भारलेल्या लोकांचा एकत्रित समुदाय. कडवा आवेश जागृत होण्याच्या बाबतीत कदाचित हा घटक सर्वात महत्त्वाचा असेल. एकाच भावनेने प्रक्षुब्ध झालेले लोक जर काही कारणाने एकत्र आले असतील जर त्यांच्या संख्येतील वाढीबरोबरच त्यांची प्रक्षुब्धताही वाढत जाते. अशा वेळी समुदाय किती तीव्र प्रतिक्रिया दाखविणार ही गोष्ट त्या समुदायाच्या संख्येवर अवलंबून असते. झगडणारांची संख्या कमी असेल व ज्यांच्याशी झगडायचे त्यांची संख्या जास्त असेल तर कमी संख्यावाले लोक 'मारू किंवा मरू' ह्या जिद्दीने प्रतिपक्षावर तुटून पडतील. ह्याच्याउलट संख्येने प्रचंड असलेला समुदाय जर एकाच भावनेने पेटलेला असला तर स्वीकृत दैवी कार्याच्या नावाखाली आख्ख्या जगाचे तळपट करावयासहीं तो तयार होईल.

मनुष्यप्राण्यात सुप्त रूपाने वसत असणाऱ्या कडव्या आवेशाच्या भावनेचे विश्लेषण येथवर आपण केले. त्यावरून आपल्या नैतिक समजुतींच्या सामर्थ्याविषयीचा आपला विश्वास किती फोल आहे हे कळून आले असेल. आपली नैतिक तत्त्वप्रणाली ही बऱ्याचदा अतिशय गोंधळाची बाब असते. नव्हे आपल्या नैतिक समजुती हा एक मोठा गोंधळच आहे. आपण संस्कृती हे नाव कशाला देतो ? पिढयान्‌पिढया चालत आलेल्या समजुती, रूढी, अंतर्निरोध ( Inhibitions ) निर्बंध व आचारविचार ह्या सर्वांच्या एकत्रित गठ्ठयाला आपण संस्कृती हे नाव देतो. आम्ही ह्या सर्व बाबींवर विश्वास ठेवतो ह्याचे कारण आमच्या भावना त्यांच्या पाठीमागे असतात. पिढयानपिढया आम्ही त्याच एका प्रकारे वागत आल्याने ह्या सर्व संस्थांचा उपयुक्तपणा गृहीत धरावयास आम्ही शिकलेलो असतो. त्यांच्या उपयुक्ततेविषयी अनुकूल अशी एक अदृश्य भावना आमच्या मनात तयार झालेली असते. ही भावना आम्हाला त्यांच्या विरुद्ध वागावयास देत नाही. ह्या मतप्रणालींना आम्ही मान देत असल्याने ती आमची मूल्ये बनतात. आम्ही ज्यांना मूल्ये म्हणतो ती आमची मूल्ये तरी काय असतात ? समाजातील धडधाकट प्रकृतीचे ( शारीरिक व मानसिक ) लोक ज्या कृतींना व धारणांना जीवनात अत्यंत महत्त्व देतात व ज्यांच्या रक्षणासाठी कसलाही, प्रसंगी प्राणाचाही त्याग करावयास तयार होतात, त्या कृतींना व धारणांना आपण मूल्ये म्हणतो. सांस्कृतिक विकासइतिहासात ह्या कृती व ह्या धारणा पवित्र मानल्या गेल्या आहेत व आमच्या पूर्वजांनी त्यांना मान दिला आहे याव्यतिरिक्त त्यांच्या सत्यतेची

दुसरी कुठलीही ग्वाही आमच्यापाशी नसते. मूल्य ह्या शब्दाची व्याख्या कशी करायची ? वंशउत्क्रांतीच्या व सांस्कृतिक उत्क्रांतीच्या व्यापारात कित्येक परंपरा, रूढी व समजुतींना मान द्यावयास व त्यांच्या रक्षणासाठी सज्ज राहावयास हवे अशी उपजत प्रवृत्तीसदृश प्रवृत्ती आपल्या शरीरात तयार होते. ही प्रवृत्ती ज्यांच्याशी बद्ध असते त्या कृतींना व धारणांना ( Object ) मूल्य मानायचे काय ? अतिप्राचीनकाळी मूल्यांची स्थिती जवळजवळ अशीच होती. सांस्कृतिक विकासइतिहासाच्या प्रारंभीच्या पर्वात सामुदायिक परंपरांना व रीतीभातींना चिकटून राहण्यात समूहाचा फायदा होता व हे प्रत्येक मानवजमातीने ओळखलेलेही होते. वंशाच्या सातत्यासाठी व रक्षणासाठी हे गट तेव्हा परंपरा मुकाटपणे मानीत असतील. परंतु तेव्हा तसे करणे आवश्यक होते तरी आजही तसे करणे आवश्यक आहे काय ? आजही पूर्वीच्याच जिद्दीने व ईर्षेने ह्या परंपरा आपण पाळावयास हव्यात काय ? कारण रूढीने चालत आलेले आचारविचारधर्म आणि विचाराला पटलेले आचारविचार ह्यात अनेकदा तफावत असते. मग प्रश्न उभा राहतो तो असा की खरे मूल्य कोणते ? खरे पाहता मनुष्याच्या जगात इतिहासाबरोबर सतत स्थित्यंतरे घडतच असतात. अशा परिस्थितीत पूर्वी कधीतरी एका विशिष्ट परिस्थितीसाठी तयार झालेले वर्तनप्रकार आज बदललेल्या परिस्थितीतही कायम चालू ठेवू पाहणे खरोखर चुकीचेच असते. कारण आता त्यांच्या पालनातून काहीतरी अनिष्टही घडण्याची शक्यता असते.

— क्रमशः

---

आणखी आणखी शिकण्याचा निग्रह आणि शक्ती माणसात निर्माण करणे हे शिक्षणाचे खरे काम असते. तरबेज (Learned) नव्हे तर शिकू पाहणारे (Learners) हेच शिक्षणाचे ध्येय आहे. शिक्षणातून शिकू इच्छिणाऱ्यांची निपज व्हावी. खरा मानवी समाज हा शिकणाऱ्यांचा समाज असेल की जेथे आजोबापासून ते थेट नातवापर्यंत सारे विद्यार्थी असतील.

तडकाफडकी सामाजिक बदलाच्या काळात शिकणारे तगतात. तरबेज मरतात. उद्यावर शिकणाऱ्यांचा हक्क चालतो. तरबेज उलटून गेलेल्या जगात वावरतात.

एरिक हॉफर

× × × ×







# ग्रंथपरिचय

## The New Industrial State
## नवीन औद्योगिक राज्य ( ७ )

• श्री. स. पु. लिमये

२५

### शैक्षणिक व शास्त्रीय संपत्ती

कामगारसंघटना नाहीशा होऊ लागल्याबरोबर, शिक्षणतज्ज्ञांचा व संशोधकांचा वर्ग झपाट्याने निर्माण होऊ लागला. हा वर्ग, तांत्रिक कॉर्पोरेशन-मधील शास्त्रज्ञ आणि इंजिनीयर्स यांचेबरोबर आतून हातमिळवणी करीत असतो, तर कॉर्पोरेशनच्या बाहेर शासकीय आधिकारी, वर्तमानपत्रकार, लेखक आणि कलाकार यांचेबरोबर संपर्क ठेवीत असतो. शाळा–कॉलेजें, विद्यापीठे आणि शिक्षण–संस्था यामध्ये असलेले शिक्षणतज्ज्ञ व शास्त्रज्ञ औद्योगिक पद्धतीतच पोसले जातात. औद्योगिक प्रगतीच्या सुरुवातीस भांडवल हा महत्त्वाचा घटक असल्यामुळे, पेढ्या, विमा–कंपन्या किंवा दलाल यांचेमार्फत देशातील बचत एकत्रित केली जात असे. आता मोठ्या कॉर्पोरेशन्समध्ये उत्पादन वाढीसाठी लागणारी महत्त्वाची गरज म्हणजे लायक व बुद्धिवान लोक. ही गरज भागविण्या-साठीच आता शैक्षणिक संस्थांची उभारणी होत आहेसे दिसते आणि समाजही आता या संस्थांकडे त्याच दृष्टीने पाहातो. जेव्हा धंद्यासाठी भांडवलालाच प्राधान्य दिले जात होते, तेव्हा काटकसर व बचत हे मोठे सामाजिक गुण समजले जात. पण औद्योगिक पद्धतीच्या उदयामुळे, सुशिक्षित व बुद्धिवान माणसांची गरज वाढली व त्यांचे महत्त्व वाढले व काटकसर हा गुण समजला न जाता, त्याला एका विक्षिप्त आणि जुनाट सवयीचे स्वरूप आले. भांडवलाप्रमाणेच शैक्षणिक व शास्त्रीय ज्ञानास उत्पादकाकडून एक मानाचे स्थान दिले गेले आहे. साहजिकच हे ज्ञान असणाऱ्या लोकाना थोडी सत्ताही मिळाली व या वर्गाचा सरकारदरबारी धनिकवर्गापेक्षा जास्त मानसन्मान होऊ लागला.

धनिक समाज व शास्त्रीय व शैक्षणिक ज्ञान यांचे साम्य फार ताणता येणार नाही. उत्पादनाच्या घटकांशी संबंध असल्यामुळेच, दोघांचे मोठेपण जाणवत असते. परंतु धनिक समाजाची सत्ता, त्याने हातात चावी धरून ठेविलेल्या हाता-सारखी आहे. भांडवलाचा ओघ कमीअधिक करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात असले,



अनुक्रमणिका



तरी त्यावर विसंबून चालतेच असे नाही. भांडवलाची वाढ करणे किंवा पत वाढविणे या गोष्टी अगदी सहज जरी करता येण्यासारख्या असल्या, तरी त्याकरिता बऱ्याच तांत्रिक गोष्टी व सव्यापसव्य करावे लागते. पूर्वीपासूनच या गोष्टी कराव्या लागत होत्या, तरी आता धनिकवर्गाची सत्ता कमी होत आहे हे मात्र सत्य आहे.

सावकाराला लोकांच्या बचतीवर ताबा ठेवता आला तरी, सुशिक्षित व शास्त्रज्ञ यांचे बुद्धीवर त्याला तावा ठेवता येत नाही. धनिक लोक फार तर नोकरांची निवड करण्यात आपला वरचढपणा दाखवितील आणि ही ताकदसुद्धा कमी महत्त्वाची मानता येणार नाही. परंतु सुशिक्षित व शास्त्रज्ञ आपल्या नव्या नव्या शोधामुळे राजकारणावर छाप पाडून ते समाजाची घडणच वदलून टाकतात व मुख्यतः यामुळेच या लोकांचे समाजातील व औद्योगिक व्यवस्थेतील वजन वाढते.

पूर्वी सुशिक्षित समाज फार लहान होता व अगदी जुजवी शिक्षण घेण्यापुरतीच त्याची मजल गेली होती. यात आता अगदी स्फोटक प्रमाणात वदल झाला आहे. औद्योगिक पद्धतीमधल्या पहिल्या अवस्थेत, जास्त तांत्रिक ज्ञान अवगत असलेले किंवा विशेष कसब असलेले फारच थोडे लोक कारखान्यात असत. त्यामुळे अशा लोकांसाठी शिक्षणसंस्थांची जरूरी भासत नव्हती व डॉक्टर किंवा वकील अशा व्यावसायिक धंद्यांच्या शिक्षणासाठीच फक्त विद्यापीठे लागत व त्यांचा उपयोग, केवळ सांस्कृतिक ज्ञानांत भर पाडून समाजाची शोभा वाढविण्यासाठी होई.

सुशिक्षित लोक संख्येने कमी आणि आर्थिक दृष्टचाही खालच्या दर्जाचे होते. त्यामुळे उच्च शिक्षणाकरिता, मुख्यतः धनिकवर्गाकडूनच मदतीची अपेक्षा केली जाई. धनिकवर्ग या संस्थांना पैसा पुरवू लागल्यामुळे, शिक्षणसंस्था चालविण्याचा हक्कही त्यांचाच आहे अशी भावना निर्माण झाली व शिक्षणसंस्थांचा अनुभव असलेले साहसी उद्योगधंदेवाले यांच्याकडेच तो हक्क जाऊ लागला. त्यामुळे हल्लीचा सुसंस्कृत समाज आपल्या फायद्यासाठी धनिकवर्गावरच विसंवून राही. खाजगी शाळा–कॉलेजात नाव घालण्याससुद्धा पैशाची किंवा धनिकांच्या वशिल्याची जरूरी लागे शिवाय त्या शिक्षणाचा फायदा मिळण्यासाठी वाट पाहण्याची मानसिक व आर्थिक तयारीही ठेवावी लागे.

शिक्षणक्षेत्रातील लोक धनिकशहाची सर्वंकष सत्ता पूर्णपणे मानण्यास तयार नसत. तात्त्विक मुद्द्यावर किंवा व्यवहारातसुद्धा, ज्यांच्याकडून त्यांना पगार मिळे, त्यांच्याविरुद्ध आवाज उठविण्यास ते मागेपुढे पहात नसत. साहसीउद्योग-धंदेवाल्यास शैक्षणिक पात्रता असलेल्या लोकांकडून आर्थिक लाभ होत असला तरी, शैक्षणिक संस्थांचे संदर्भात जर या फायद्याचा विचार केला, तर त्यास सामुदायिक अपयश अंगच म्हणावे लागेल. कारण जरी सुशिक्षिक समाज आपले वैगुण्य कबूल करीत होता किंवा ते गृहीत धरीत होता, तरी तो आपली उद्दिष्टे





बुद्धीच्या कसोटीने जास्त उच्च व एखाद्या साहसी धंदेवाल्याच्या विचारांपेक्षा जास्त प्रगल्भ आहेत असे मानीत होता. मात्र या विचाराचें आकलन कोणालाच चांगल्या प्रकारे झाले नाही. त्यामुळे औद्योगिक संस्था व शिक्षणसंस्था यांच्यात सदैव कुरबुरीचें व संशयाचे वातावरण पसरत चालले.

अमेरिकेतील सामाजिक क्रांती घडवून आणण्याचे बाबतीत शिक्षणसंस्थांनी जो भाग घेतला, त्यामुळे हे संबंध आणखीनच दुरावले. सुशिक्षित लोकांना एखादे विधेयक मंजूर करून घेण्यासाठी किंवा नापास करून घेण्यासाठी बौद्धिक पातळीवर काही करता येणे शक्य असले तरी, औद्योगिक संस्था, कामगारसंघटणा किंवा राजकीय पक्ष यांना समाजात सुधारणा घडवून आणण्यासाठी काही करता येत नाही. समाजसुधारणेच्या कल्पना, मुख्यतः शैक्षणिक संस्थांमधूनच उगम पावलेल्या असतात.

औद्योगिक सुधारणा मानवी दृष्टिकोणातून आणि सर्वांना न्याय मिळावा याच केवळ हेतूने व्हावी, म्हणून सामाजिक सुधारणेसाठी प्रयत्न व्हावेत अशी समजूत औद्योगीकरणाच्या पहिल्या अवस्थेत होती. अशा सुधारणांची गरज मुख्यतः प्राध्यापकांनाच असे. त्यांच्याकडून मक्तेदारी नियंत्रित करण्याची, किंमती ठरवून देण्याची, कामगार-संघटनांना पाठिंबा देण्याची, कराच्या आकारणीत सुधारणा करण्याची, नोकरीची परिस्थिती सुधारण्याची आणि वेळप्रसंगी खाजगी धंदेवाल्यांना हुसकून लावण्याची भाषा बोलली जाते, तेव्हा या व्यापारीवर्गाला नुसते बघतच बसावे लागते ! या सुधारणा म्हणजे शैक्षणिक विषयांचा एक नुसता पुस्तकी भाग राहात नाही, तर त्या सुधारणा कार्यान्वित करणे हे काही सुशिक्षित लोकांचे ध्येयच बनते.

बरेच वेळा, शैक्षणिक क्षेत्रातील मत, समाजातील प्रतिष्ठित, पुराणमतवादी; मध्यमवर्गीय लोकांच्या मतांशी अनुकूल असे आणि ह्या मध्यमवर्गास धनिक लोकांबद्दल जास्त आपलेपणा असे. शिवाय साहसी धंदेवाल्यास अप्रिय वाटणारे बरेच कायदे किंवा सरकारी धोरणे यांचे समर्थन बरेच वेळा हे शिक्षणक्षेत्रातील लोकच करीत.

पूर्वी सुसंस्कृत व शिक्षणक्षेत्रातील समाज हा रागीट, निकृष्ट व कच्चा मानला जात असला तरी त्यासच समाजात सुधारणा घडवून आणण्याची कुवत असल्यामुळे, इतर बऱ्याच तऱ्हेने तो समाजावरील आपले वर्चस्व कायम ठेवितो. आर्थिक सत्ता मात्र अगदी उघडया-नागडया स्वरूपात आपले अस्तित्व प्रगट करिते. आपणाशी जुळवून घेणाऱ्यांना ते आर्थिक लाभ देऊ शकतात, तसेच त्यांच्या विरोधकानी ते धाकही दाखवू शकतात. याउलट सुधारणा घडवून आणण्याकरिता केलेल्या सुशिक्षित माणसाच्या सूचना काही वेळा विक्षिप्तपणाच्या व अशक्य अशा स्वरुपात प्रथम पुढें येतात. हळूहळू त्यांना दुजोरा देणारे मिळतात

आणि अल्पावकाशात, या सुधारणांना जरुरीचे स्वरूप प्राप्त होते. नंतर जन्मसिद्ध मानवी हक्कात त्यांची गणना केली जाते. ज्या लोकांनी हे विचारचक्र सुरू केले, त्यांना सत्तेची अभिलाषा होती असे म्हणता येणार नाही. पण सामाजिक सुधारणा घडवून आणण्याची पात्रता असणाऱ्यांमध्ये जी सत्ता अभिप्रेत आहे, तिचे महत्त्व कळण्यासाठी तूर्त इतकेच म्हणता येईल की, ही सत्ता एका काळी शिक्षणक्षेत्रातली मंडळी व धंदेवाले लोक यांच्यामधील संघर्षास कारणीभूत होत होती,

कॉर्पोरेशनमध्ये तांत्रिक ज्ञानाची वाढ झाल्यावरोवर, आर्थिक बाबतीत साहस करणाऱ्यांचा वर्ग आणि सुशिक्षित आणि शास्त्रज्ञ यांच्यातील संबंधात झपाट्याने फरक पडतो. कामाला प्रवृत्त करण्याचे मार्गात आता एकदम विरोध दिसून येत नाही. कारण उद्योगातील सुशिक्षित व तंत्रज्ञ, आपापली कामे केवळ पैशासाठीच करीत नसतात. दोघेही सामाजिक उद्दिष्टांशी आणि त्यासाठी काम करणाऱ्या कॉर्पोरेशन्सच्या ध्येयाशी एकरूप झालेले असतात. कॉर्पोरेशनच्या व त्यांच्या उद्दिष्टात फरक असा नसतो व असलाच तर तो त्यांना कामास प्रवृत्त करण्याच्या पद्धतीत असतो असे ते मानतात. या वेळी शास्त्रज्ञांचा समाज खूपच मोठा झालेला असतो व त्यांची वरीचशी सोय सरकारनेच केलेली असते. त्यामुळे त्यांचेवरील खाजगी नियंत्रण कमी झालेले असते. साहसी उद्योगधंदेवाल्यांप्रमाणे, स्वतःच्या चालकत्वाची किंवा संपत्तीची जाणीव कॉर्पोरेशनमधील तंत्रज्ञात असत नाही; कारण कॉर्पोरेशनचे पैसे त्यांच्या अखत्यारीत नसतात. धनिक लोकांनी शिक्षणासाठी पैसा नाकारला, तर त्याला पर्याय कर वाढवून पैसा उभा करणे हाच असतो. धनिकवर्गास स्वानुभवाने हे माहीत झालेले असते की, कॉर्पोरेशनमध्ये त्यांचे भांडवल असले तरी, कॉर्पोरेशनच्या व्यवहारांत ढवळाढवळ करण्याची सत्ता केवळ त्यांच्या संपत्तीमुळे त्यांना येऊ शकत नाही.

धंद्यातील तंत्रज्ञगटाला नेहमी विज्ञानातील नव्या नव्या शोधांवरोबर राहावे लागते. या वाढलेल्या ज्ञानाचा आणि समाजातील सुधारणांचा मोठ्या कॉर्पोरेशन्सना फायदाच होतो. सामाजिक सुधारणांवर कायद्याने करावा लागणारा खर्च, वैद्यकीय मदत, वेकारांना भत्ता, झोपडपट्ट्यांच्या सुधारणा वगैरे—हा गिऱ्हाइकांवर लादता येतो किंवा कमी नफा वाटून तो भागधारकांकडून वसूल करता येतो. कॉर्पोरेशनमधील नोकरशाहीच, हे काम न सांगताच तत्परतेने करीत असते. याउलट साहसी धंदेवाल्याला हे स्वतःलाच करावे लागते.

या वेळी हे लक्षात ठेविले पाहिजे की, सामाजिक परिवर्तन घडवून आणण्यासाठी एकूण मागणीवर नियंत्रण व किंमती व वेतन यांतील स्थिरता, असे जे उपाय योजलेले असतात, ते नियोजनासाठी आणि पर्यायाने मोठ्या कॉर्पोरेशन्ससाठी महत्त्वाचे असतात.



अनुक्रमणिका



सामाजिक बदलास क्रांतीचा वास येत नाही. आणि शिक्षणक्षेत्रातील लोक इतर मोठ्या बुद्धिवान वर्गाप्रमाणे क्रांतीबद्दल निष्फळ वादविवाद करीत बसत नाहीत. कामगारवर्गाची दैन्यावस्थेतून हळूहळू सुटका करणे हा क्रांतीचा हेतू आहे अशी मार्क्सची समजूत होती; पण आता दैन्यावस्थेऐवजी, त्यांचे जीवन अधिकाधिक समृद्ध होत आहे. मार्क्सवादी लोक हे नाकबूल करीत नाहीत किंवा कामगारवर्गाची सुधारलेली स्थिति, फसवी आणि तात्पुरती आहे असेही ते मानीत नाहीत. परंतु औद्योगिक पद्धतीमध्ये, एकूण मागणी ताब्यात ठेवण्यात येते व त्याबरोबरच मंदी टाळली जाते किंवा निदान तिचे दुष्परिणाम कमी केले जातात. त्यामुळे येऊ घातलेल्या पेचप्रसंगाचे संकट अधिक दूरचे आहे असे भासते. कामगाराच्या लढाऊवृत्तीचे प्रदर्शन करणारी मजूरचळवळ ही क्रांती घडवून आणण्यास कारणीभूत होई, पण औद्योगिक पद्धतीमध्ये कामगारसंघटनांची शक्तिच जणू छिनली जाते किंवा कामगारसंघटनांनाच ती पद्धत आपलीशी करून टाकते. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे काही देशांत क्रांत्या झाल्या; पण त्या देशातील औद्योगिकरणाच्या स्वरुपाबद्दल, पन्नास वर्षांपूर्वी जी भीती किंवा सांशकवृत्ती आणि आशा होत्या, त्याच्यापेक्षा त्या वेगळ्या नव्हत्या. ज्याच्यावर क्रांती अवलंबून आहे असे मानले जात होते, ती परिस्थिती आणि प्रत्यक्ष क्रांती यांचे आता विभाजन झाले आहे आणि हे विघटन आता थांबविता येणार नाही.

तांत्रिक कॉर्पोरेशन्सना शैक्षणिक व शास्त्रीय ज्ञानावर विसंबून राहावे लागते. त्यामुळे त्यांचा या दोन्हींवरील संबंधांवर परिणाम होणे अपेक्षितच मानले पाहिजे. आता, एखाद्या धंद्याचा व्यवस्थापक महाविद्यालयाच्या संचालकमंडळावर केवळ वहिवाटीने आलेले एक मानाचे स्थान एवढ्याच भावनेने बसतो. पण त्याच्या तेथील हजेरीमुळे, त्याला शैक्षणिक व शास्त्रीय क्षेत्रातील मंडळींबरोबर संपर्क ठेवता येतो व शास्त्रीय ज्ञानात होणाऱ्या घडामोडींवर त्यामुळे दैनंदिन लक्ष राहाते. धंद्यामधील प्रत्येक क्षेत्रात, त्या त्या क्षेत्रातील तज्ज्ञ मंडळींची व शास्त्रज्ञांची हरघडी गरज लागते. त्यामुळेच, संचालकमंडळावर एखाद्या मोठ्या पेढीच्या, मालकाचे नाव असणे याला महत्त्व प्राप्त होते. तसेच महत्त्व आता तंत्रज्ञ किंवा महाविद्यालयाचा प्राचार्य यालाही त्या जागी आले आहे.

काही गोष्टी केवळ परिस्थितीमुळे घडून येतात; पण त्या शिक्षण किंवा नीतिमत्ता सुधारल्यामुळे दिसून येतात, असे मानण्याची आपली प्रवृत्ती आहे. पूर्वी आपण शिक्षणतज्ज्ञ व साहसी उद्योगपती यांच्या उद्दिष्टातील विसंगती पाहिली. त्याच संदर्भात असे दिसते की, चाणाक्ष साहसी धंदेवाला अध्यापकवर्गाच्या व्यक्ति–स्वातंत्र्यविरोधी धोरणामुळे त्याचा धिःकारच करीत असतो. खरे म्हणजे साहसी धंदेवाल्याला व्यक्ति–स्वातंत्र्य हवे असते ते केवळ जास्त

नफा मिळविण्यासाठीच. आता मात्र मोठ्या कॉर्पोरेशनमधील तंत्रज्ञांना विद्यापीठातील चर्चेत विरोधी भावना तीव्रतेने आढळून येत नाहीत.

औद्योगिक पद्धतीचा हल्ली दिसणारा विस्तार, शैक्षणिक व शास्त्रीय ज्ञानामुळेच झाला आहे. पण औद्योगिक पद्धतीच्या उद्दिष्टांशी हे लोक कितपत समरस झाले आहेत? याबाबत सर्वसाधारण ठोकळ अनुमान काढता येणार नाही. औद्योगिक पद्धतीच्या ध्येयात शिस्त म्हणून मोठ्या प्रमाणात अर्थशास्त्रज्ञ समावून घेत आहेत. या उद्दिष्टांशी विसंगत असे जे निष्कर्ष निघतात ते केवळ तर्कावरच आधारलेले असतात. हे निष्कर्ष बाजारपेठेला व जास्तीतजास्त नफा मिळविण्याच्या ध्येयाला कमी लेखतात व जाहीरातीच्या परिणामांना जास्त महत्त्व देतात. गिऱ्हाइकाच्या सार्वभौम हक्कावर व मान्य अनुक्रमावर अविश्वास दाखवितात. एखादा रसायनशास्त्रज्ञ कंपनीत अहोरात्र खपून कंपनीच्या उद्दिष्टांशी समरस होईल. त्याच वेळी त्याच्या विद्यापीठाच्या ध्येयाशीही तो जुळवून घेईल, कारण विद्यापीठातील त्याचा विभाग, त्याच्या अध्यापनातील कर्तृत्वापेक्षा, त्याच्या धंद्यातील यशावर त्याची योग्यता ठरवील. यावेळी आर्थिक भरभराट हेच सर्वसाधारण उद्दिष्ट ठरते. विद्यापीठातील इतर शाखातले लोक मात्र, शिक्षणसंस्थांच्या जुन्या ध्येयांची जास्तच हिरीरीने तारीफ करीत राहतील व त्या रसायनशास्त्रज्ञाला दूषणे देऊन, त्याच्यावर स्वार्थीपणाचा आरोपही करतील. शास्त्रज्ञ लोक दुखावलेल्या व काहीशा संतप्त भावनेने या आरोपांना उत्तरे देतात व त्याजबरोबर त्यांच्या खर्चाची तरतूद करण्याची आवश्यकताही प्रतिपादतात. जवळजवळ सर्वच मोठ्या विद्यापीठातून अशी चर्चा व वादविवाद चालू असतो.

कॉर्पोरेशन्सना मागणी नियंत्रित करण्यासाठी, व्यक्तिगत वागणुकीवरही नियंत्रण ठेवावे लागते व येथेही सुशिक्षित व शास्त्रज्ञ यांचा कॉर्पोरेशनबरोबर संघर्ष होत असतो. पण या संघर्षाचे नेमके स्वरूप कळले नसल्यामुळे, यासंबंधीचे भांडण त्याच्या कारणांवर केंद्रित न होता, व्यवस्थापनशास्त्रावर केंद्रित होते. कॉर्पोरेशनच्या कारभारव्यवस्थेत संपर्क ठेवता येणारी वर्तमानपत्रे, जाहिराती, रेडियो अशासारखी परिणामकारक साधने असावी लागतात. त्याचप्रमाणे ज्याची विक्री करावयाची, त्याची उपयुक्तता पटेल अशी ती साधने असतील हेही पहावे लागते.

शैक्षणिक व शास्त्रीय क्षेत्रातील समाज जाहिराती, वर्तमानपत्रे वगैरे गोष्टींकडे कॉर्पोरेशनच्या व्यवस्थापनशास्त्राच्या दृष्टीने तिरस्काराने पाहात असतो. कॉर्पोरेशनमधील लोक हे जाणून असतात, पण मागणी नियंत्रित करण्याची गरज असल्यामुळे, समाजाची आर्थिक प्रकृति विशेष निकोप ठेवण्याचे हेतूने या जाहिरातशास्त्राचे समर्थन केले जाते.

आणि येथेच विरोधाभास निर्माण होतो. आर्थिक व्यवहाराच्या यशासाठी

पूर्वनियोजित सामाजिक बनवाबनवी करावी लागते. त्याजबरोबर कॉर्पोरेशनकडून असा एक वर्ग पोसला जात असतो की, तो स्वतःस या बनवाबनवीला साद न देणारा आहे असे समजतो व हा सर्व प्रकार बुद्धीच्या दिवाळखोरीचा म्हणून त्याचा धिःकार करीत असतो.

व्यक्ती व समाज यामधील संघर्ष नियोजनात अटळ आहे. नियोजनामध्ये व्यक्तीच्या स्वच्छंद मतप्रदर्शनापेक्षा, उत्पादनातील गरजांना अग्रक्रम द्यावा लागतो. त्यामुळे साहजिकच व्यक्ती नाराज होतात. कम्युनिस्ट देशात, ही नाराजी, व्यक्तीवर घातलेल्या निर्बंधांची अंमलबजावणी करण्यासाठी जी प्रचंड यंत्रणा असते, त्या यंत्रणेविरुद्ध व्यक्त करावी लागते. इतर देशात व्यक्तीवर नियंत्रण ठेवण्यासाठी जाहिरातीसारख्या ज्या साधनांचा उपयोग केला जातो, त्याविरुद्ध ही नाराजी प्रकट होते. गंमत ही की, आर्थिक नियोजन हे जरी या सर्वांच्या मुळाशी असते, तरी त्याच्याविरुद्ध कोणीच हल्ला चढवू इच्छित नाही.

शैक्षणिक व तंत्रज्ञ समाज, तसेच तांत्रिक कॉर्पोरेशन्स यांचे सरकारबरोबरचे संबंध वाढत जात असतात. त्याबरोबर त्यांचेमधील स्वाभाविक चढाओढ व विरोध हासुद्धा वाढत असतो. कॉर्पोरेशनमधील तंत्रज्ञ आपल्या संस्थेपासून दूर जाऊ शकत नाही आणि तो त्याच्या संस्थेकडून राजकारणातही ओढला जात नाही. पण समाजात तो जणूकाय नोकरशाहीचाच हात बनून, समाजावर दडपण आणू शकतो.

शैक्षणिक व शास्त्रपारंगत समाज राजकारणविन्मुख होत नसला तरी या समाजाला अजून स्वतःची पुरती ओळख पटलेली नाही. बरीच वर्षे तो साहसी उद्योगधंदेवाल्याच्या छायेतच वावरत आला आहे. निष्ठुर वृत्ती व मार्क्सवादाचे राहिलेले अवशेष, यामुळे संपत्तीवर अधिष्ठित नसलेल्या सत्तेला कमी लेखण्यात येते. परंतु अशा शैक्षणिक व शास्त्रीय क्षेत्रातील समाजास, राजकीय सत्ता म्हणून वावरण्यास एखाद्या क्रियाशील राजकीय विचारवंताची गरज लागणे शक्य आहे. नोकरशाही व मोठी कॉर्पोरेशन्स यांच्या प्रस्थापित संबंधांना आवाहन देण्यास ही सत्ता उपयोगी पडेल. उपभोग्य वस्तूंवरील ताबा ठेवण्याचे प्रयत्न हे जसे लोकांच्या भ्रामक विचारावर आधारलेले असतात, तसेच कॉर्पोरेशन्स व सरकार यांचे प्रस्थापित संबंधसुद्धा लोकांच्या भ्रामक समजुतीवरच आधारलेले असतात.

## २६

### औद्योगिक पद्धत आणि सरकार

औद्योगिक पद्धतीमध्ये, लायक मनुष्यबळाची फार आवश्यकता असते व ज्या शिक्षणामुळे ते तयार होते ते शिक्षण सार्वजनिक उद्योगधंद्यांतूनच मिळत असते.







पण इतके दिवस महत्त्वाचे मानले जाणारे धंद्यातील भांडवल मात्र खाजगी क्षेत्रातून येते. सार्वजनिक क्षेत्रातच प्रगत अशा तांत्रिक ज्ञानास जास्त वाव मिळतो व त्यामुळे तेथे नियोजन सुलभ होते. बरेचसे शास्त्रीय संशोधन सरकारमार्फत, किंवा सरकारच्या आश्रयाखालील विद्यापीठे किंवा इतर तत्सम संस्था यांचेमार्फतच होते. औद्योगिक पद्धतीतील उत्पादित वस्तूंच्या मागणीचे नियमन सरकामार्फतच होते आणि तीच नियोजनाची गरज असते. सरकारकडूनच वेतन आणि किंमती यांचे नियंत्रण केले जाते, कारण त्याच्या अभावी औद्योगिक पद्धतीतील किंमती अस्थिर राहाण्याचा धोका असतो. एकंदरीत सरकारचे औद्योगिक पद्धतीशी फार घनिष्ट संबंध असतात. काही विशिष्ट प्रसंगी मोठी कॉर्पोरेशन्स म्हणजे सरकारचाच एक भाग समजला जातो आणि महत्त्वाच्या बाबतीत औद्योगिक पद्धत चालू ठेवण्यात सरकारचा हात असतो. अर्थशास्त्राच्या नेहमीच्या सिद्धांताशी हे विसंगत वाटते आणि खाजगी व सरकारी उद्योग-धंद्यातील भेद त्यामुळे स्पष्ट होतो. कोणते धंदे खाजगी ठेवावयाचे व कोणते सार्वजनिक मालकीचे करावयाचे, यावर सरकार समाजवादी आहे किंवा नाही हे ठरत असते. खाजगी व सार्वजनिक संघटना जर एकत्र आल्या, तर पुरोगामी व पुराणमतवादी अशा दोन्ही लोकांकडून ते एक पाप समजले जाते. खाजगी फायद्यासाठी सार्वजनिक सत्ता वापरली जात आहे असे उदारमतवादी लोकांना वाटते, तर पुराणमतवादी लोकांना खाजगी व्यक्तीचे अधिकार सरकारकडे सोपविले जात आहेत असे वाटते. खरे म्हणजे, औद्योगिक पद्धतीत खाजगी सत्ता व सरकारी सत्ता यातील भेद अस्पष्ट व केवळ कल्पनेवर आधारलेलेच असतात.

साहसी धंदेवाला व सरकार यांचे आजवरचे संबंध मुख्यत: पैशाचे व बरेच अस्थिर असे होते. कॉर्पोरेशन मक्कम पायावर उभे असेल तर सार्वजनिक नियंत्रणाचा त्यावर परिणाम होणार नाही. उलट आपले उत्पन्न वाढविण्यासाठी ते कॉर्पोरेशन सार्वजनिक सत्तेचाच उपयोग करील. सरकार खंबीर असेल, तर ते खाजगी सत्ता ताब्यात ठेवून फायद्यावरही नियंत्रण ठेवील. एखाद्या धंद्याचे राष्ट्रीयीकरणही करू शकेल. एक बाजू दुबळी असेल, तर दुसरी बाजू त्याचा फायदा घेतल्यावाचून राहाणार नाही व एकमेकांचे एकमेकांवरील वर्चस्व टाळण्यासाठी दोघांनाही सदैव जागरूक राहावे लागते.

साहसी धंदेवाला व सरकार यामधील नाते, हे असे विरोधी आहे असा पूर्वी समज होता, पण आता या नात्यात खूप बदल झाला आहे. पाउणशे वर्षांपूर्वी, कॉर्पोरेशन ही सार्वभौम व शक्तिशाली संघटणा आहे अशी समजूत होती व सरकारकडून धंद्याचे नियंत्रण करण्याची कल्पना भीतीदायक मानली जात असे. कालांतराने मात्र सरकारच्या दडपणाची भीति वाटू लागली आणि

आता तर कॉर्पोरेशन म्हणजे एक सरकारचीच प्रतिकृती वाटू लागली आहे. साहसी धंदेवाले आपल्या अडचणींचा विचार करण्याकरिता आता जेव्हा एकत्र येतात, तेव्हा ते मुख्यतः सरकारवरच टीका करताना आढळतात. साहसी धंदेवाल्यांचे सरकारबरोबरचे नाते पैशाचे होते हे आपण पाहिलेच. साहसी धंदेवाल्याला फायदा मिळवून देता येण्याजोग्या बऱ्याच गोष्टी सरकारला करता येणे शक्य होते; त्याचप्रमाणे कर बसवून किंवा इतर नियंत्रणे लादून धंद्याचे उत्पन्न कमी करण्याची सरकारची ताकद होती. साहसी कंपन्याजवळही आवश्यक गोष्टी मिळवण्यासाठी पैसे मोजण्याची तयारी होती व तसे करण्यात कायदेशीर किंवा इतर अडचणी येण्याचा फारच थोडा संभव होता. जकाती लादून, रेल्वेच्या किंवा विजेच्या दरात सवलती देऊन किंवा अशा इतर अनेक मार्गांनी सरकारला धंदेवाल्यांच्या उपयोगी पडता येत होते व विशेष म्हणजे अगदी सहजरीत्या निर्णय घेऊन या सर्व सवलती दिल्या जात होत्या किंवा काढून घेतल्या जात होत्या. याउलट साहसी धंदेवाले आपणास सोयीस्कर वाटणाऱ्या राजकीय उद्दिष्टांसाठी भरपूर प्रमाणात पैसा उपलब्ध करून देत. पैशाचे सर्व अधिकार साहसी धंदेवाला स्वतःकडे ठेवीत असल्यामुळे, त्याला मते विकत घेऊन, जरूर त्या सवलती मिळविणे शक्य असते. कंपनीचे पैसे अशा रीतीने खर्च करण्यावर जरी काही कायदेशीर बंधन घातले गेले, तरी त्यातून निसटण्यास त्यास पळवाटा सापडतच. आर्थिक लाभाच्या आमिषाने तो राजकीय उद्दिष्टासाठी पैसा खर्च करण्यास तयार होतो.

आर्थिक व्यवहारात ज्या समाजाचे पैसा हेच मुख्य आकर्षण आहे, तेथे कंपनी आणि सरकार यांच्या संबंधातील पैशाचे आकर्षण नेहमीचेच समजले जाते. सरकारी नोकर आर्थिक लाभ मिळविण्याची संधी दवडणार नाहीत अशीच समजूत असते व ही समजूत गैरवाजवीही वाटत नाही. पैसा हेच ध्येय आहे असे समाजाने ठरविले की, सरकारी नोकरांना आपले निर्णय विकून पैसा मिळविण्यात काही वावगे आहे असे वाटत नाही. साहसी उद्योगधंद्याच्या भरभराटीच्या काळात, हे लोक पैशाच्या जोरावर सरकारवरच हुकूमत चालवीत व या कंपन्या सर्वसाधारण जीवनावर आपला प्रभाव पाडतात अशी समजूत दृढ होण्याइतपत, त्यांचे अशा प्रकारचे व्यवहार चालत. आजही कंत्राटदार विमा-कंपन्या, वगैरेसारखे साहसी उद्योगधंदेवाले लोक राजकीय कामासाठी पैसे पुरविण्यात व त्यामुळे आपले वर्चस्व प्रस्थापित करण्यात अग्रेसर आहेतच. साहसी कॉर्पोरेशन्समध्ये लाच देऊन आर्थिक लाभ मिळविण्याचे सामर्थ्य होते, पण त्याच वेळी ही कॉर्पोरेशन्स सरकारपासून स्वतंत्र अशी होती. बाजारात आपला माल खपवूनच ती आपले उत्पन्न मिळवीत असत आणि नंतर जास्त उत्पन्नासाठी मात्र अन्य मार्गाने आपली कामे ते करून घेत.



अनुक्रमणिका



१९३०चे सुमारास, कामगारचळवळीच्या उदयामुळे व औद्योगिक पद्धतीच्या गरजांकडे लक्ष देण्याची सरकारची प्रवृत्ती वाढल्यामुळे, कॉर्पोरेशन्सऐवजी सरकारच धंद्यावर वर्चस्व गाजवील की काय अशी भीती निर्माण झाली. यावेळी व्यापारात मोठी मंदी आल्यामुळे, कामगारचळवळीला जोर चढला. या मंदीत, कामगाराजवळचे समेटाचे इतर सर्व पर्याय गाडले गेले आणि त्याला कामाला चिकटून राहण्यास सक्ती करण्यात आली. त्यामुळे मालकाच्या उद्दिष्टात समरस होण्याच्या कामगाराच्या प्रवृत्तीस खीळ बसली. याचा परिणाम कामगारास कामगारसंघटणेचे अधिक महत्व वाटू लागण्यात झाला. कामगारसंघटनांची सभासदसंख्या वाढल्यामुळे, तिला राजकारणात स्थान मिळाले. कामगारसंघटणेचे कार्य जसे कॉर्पोरेशनच्या विरोधी होते, तसे सरकार–विरोधीही होते. कामगार–संघटनांजवळ पैसा नव्हता, पण मताचा अधिकार होता. साहसी उद्योगवाल्यांना विरोध करणारा शैक्षणिक व शास्त्रीय क्षेत्रातील समाज, हा कामगार संघटनांना आणखी एक मित्र मिळाला. त्यामुळे औद्योगिक क्षेत्रात साहजिकच असा समज झाला की, यापुढे त्याना सुशिक्षित समाज व कामगारसंघटना यांचे राजकीय वर्चस्व असलेल्या सरकारपुढेच आपली मान तुकवावी लागणार. साहसी कॉर्पोरेशन्सही याच वेळी मोठाल्या कॉर्पोरेशन्सबरोबर समझोता करून, त्यातील तंत्रज्ञगटाची सत्ता मान्य करू लागली होती.

कोणतीही प्रत्यक्ष राजकीय कृती करण्यात, कॉर्पोरेशन्समधील तंत्रज्ञगट साहसी धंदेवाल्यापेक्षा कमकुवत होता ही गोष्ट महत्त्वाची आहे. कॉर्पोरेशनमधील तंत्रज्ञ लोक व्यक्तिशः उत्पन्न मिळवीत नसतात. अगदी सुरुवातीला कॉर्पोरेशनमधील उत्पन्न राजकीय कामाकरिता वापरण्यावर बंधन घालण्यात आले, पण त्यामुळे साहसी धंदेवाल्याचे काही वाकडे झाले नाही; कारण धंद्याचा पैसा राजकीय कामाकरिता वापरण्याच्या त्यांच्या युक्त्या ठरलेल्या होत्या. पण मोठ्या कॉर्पोरेशन्समधील तंत्रज्ञाना मात्र हे शक्य होत नसे. शिवाय त्यांना तसे करण्यासाठी काही आकर्षणही नव्हते. लाच देणे किंवा घेणे ही काही मोठी प्रतिष्ठेची गोष्ट नव्हती, कारण त्यामुळे नको असलेली प्रसिद्धी मात्र मिळे. धंदेवाल्याचे बाबतीत मात्र लाच देऊन त्याला स्वतःचाच फायदा करून घ्यावयाचा असल्याने, तो ती देण्यातील सर्व धोके पत्करण्यास सदैव तयार असे.

कॉर्पोरेशनमधील तांत्रिक व्यक्तींना राजकारण करण्यात आणखी एक अडसर होता, तो म्हणजे त्यांच्या शैक्षणिक श्रेष्ठपणाचा. राजकारणातील पुढारीपण ही व्यक्तीची कामगिरी असते; त्यामुळे कॉर्पोरेशनसारख्या सामुदायिकरीत्याच काम करू शकणाऱ्या संस्थांना ते जमत नाही. कॉर्पोरेशनमधील तंत्रज्ञ मंडळींना, वर्तमानपत्रे, रेडिओ वगैरेंमारफत संपर्क साधण्याची साधने सहजासहजी उपलब्ध असल्यामुळे, राजकारणावर अन्य तऱ्हेने प्रभाव पाडणे त्यांना शक्य होते. मोठ्या



अनुक्रमणिका

कॉर्पोरेशन्सना आपल्या गरजेनुसार राजकीय कृती घडवून आणण्यासाठी, किरकोळ लाचलुचपत नेहमीच चालू ठेवावी लागते. पण त्याचबरोबर प्रत्यक्ष लाच देण्याऐवजी, विधिमंडळातील सभासदांचे आपल्या बाजूने मतपरिवर्तन करण्यासाठी बऱ्याच मोठ्या रकमा बाजूस ठेवाव्या लागतात. कामगारसंघटनांच्या वाढत्या सामर्थ्याला व सरकारी नियंत्रणाला जो विरोध केला जातो, तो मोठ्या व स्थिर अशा कॉर्पोरेशन्सकडून नव्हे, तर जीव धरुन असलेल्या साहसी धंदेवाल्यां-कडूनसुद्धा हा विरोध होत असतो.

मोठ्या कॉर्पोरेशन्सपेक्षा लहान साहसी उद्योगधंदेवाल्यांवर सरकारी कृतीचा फार परिणाम होतो. जे पहिल्याला तापदायक वाटते, ते दुसऱ्यास सवलतींसारखे असते. उदाहरणार्थ, एकूण मागणीवरील नियंत्रण औद्योगिक व्यवस्थेमधील नियोजन परिणामकारक होण्यास आवश्यक असते व म्हणून कॉर्पोरेशन्सकडून त्याचे स्वागत होते; पण मोठे सार्वजनिक क्षेत्र चढत्या प्रमाणातील करआकारणी व बेकारीच्या विम्याचे कायदे वगैरेंचे स्वागत होत नाही, पण हे सर्व नियंत्रण ठेवण्यासाठीच उपयोगी पडते.

याउलट साहसी उद्योगधंद्यातील लोकास एकूण मागणी नियंत्रित करण्याची गरजच भासत नाही. ते औद्योगीकरणांच्या पहिल्या अवस्थेत असल्यामुळे, त्यांना नियोजनाचीही गरज पडलीं नाही. त्याचे उत्पन्न कमी झाले तर त्याला तोच जबाबदार असतो. त्याच्या धंद्यात थोडेच लोक असल्यामुळे, त्या मानाने त्याच्या-वर थोडी जबाबदारी पडे आणि जास्तीत जास्त नफा मिळविण्याचे त्याचे धोरण असल्यामुळें, करांमध्ये वाढ झाली की त्याची झळ इतर बाबींवर होणाऱ्या जादा खर्चाप्रमाणे त्याला स्वत:लाच सोसावी लागते.

सरकार भागवू शकेल यापेक्षा कितो तरी कमी प्रमाणात, साहसी धंदे-वाल्यास तंत्रज्ञांची गरज भासते. त्याची यंत्रे जुन्या पद्धतीची असतात. व त्यामुळे-संशोधन होत असूनसुद्धा त्यास विशेष फायदा होण्यासारखा नसतो. किंमती मर्यादित केल्यामुळे, मोठ्या कॉर्पोरेशन्सना वेतन नक्की करण्यास मदत होते, तर साहसी उद्योगधंदेवाल्यांचे बाबतीत, किंमती स्थिर ठेवल्या गेल्या तर त्याचा स्वत:चा नफा कमी होण्याचा धोका असतो.

सरकारी हस्तक्षेपाच्या या परस्परविरोधी परिणामांचे चित्र फार भयानक-पणे रंगविणे ही मात्र चूक ठरेल. सकृत्‌दर्शनी जी सरकारी सत्ता नुकसानकारक वाटली, ती मुख्यत: साहसी कॉर्पोरेशन्सचे नुकसान करणारी होती. मोठ्या कॉर्पोरेशन्सचे बाबतीत ती तशी तर नव्हतीच, उलट त्याच्या गरजा भागविण्यास ती उपकारकच ठरत गेली.

अमेरिकेतील औद्योगिक क्षेत्रातील लोकांना नेहमीच सरकारचे भय वाटते. कोणत्याही पक्षाच्या राजकारणी लोकांबद्दल, अविश्वासाची व तिरस्काराची

भावना ठेवणे हे १९३०चे सुमारातील औद्योगिक क्षेत्रातील लोकांचे जणू ब्रीदच होते. असे वरवर जरी दिसत असले, तरी वस्तुस्थिती मात्र तशी नव्हती. हळूहळू धंद्याकडे पाहाण्याचा कल ठरून जाऊ लागला. अमेरिकेत संघटणांवर राजकीय नियंत्रण नसल्यामुळें हे साहसी धंदेवाले आपली गाऱ्हाणी स्पष्टपणें मांडण्यास कचरत नसत. पण मोठ्या कॉर्पोरेशन्समधील तंत्रज्ञ लोक काही बोलत जरी नसले, किंवा बोललेच तर, साहसी धंदेवाल्यांच्या सरकारविरुद्धच्याच तक्रारींचा पाढा ते वाचीत. फार तर अंतर्गत निर्णय घेण्याचे बाबतीत, त्यांना हव्या असणाऱ्या स्वातंत्र्याचाच ते उल्लेख करीत. साहसी उद्योगवाल्यांच्या हे लक्षात येत नसे की, सरकारच्या सर्व योजना मोठ्या कॉर्पोरेशन्सच्या गरजा भागविण्यासाठी आहेत. इतर व्यापारी व सरकार हे दोघे मिळून साहसी धंदेवाल्याविरुद्ध जणू कारस्थानच रचीत आहेत, या गोष्टींची त्या साहसी धंदेवाल्यांना जाणीवही नव्हती.

सरकार व व्यापारी यांचे संबंध कधीच एकजिनसी नसतात. राजकीय सत्तेचे म्हणजेच मते मिळविण्याचे बाबतीत हे संबंध विशेष महत्त्वाचे असत. मोठ्या कॉर्पोरेशन्सजवळ अशा प्रकारची सत्ता नव्हती, तरी सरकारकडून ती आपल्या गरजा भागवून घेत असत. गरजा पुरविण्याच्या बाबतीत सरकारकडून होणारी मदत, साहसी धंदेवाल्यांना तितकीशी लाभदायक होत नाही व त्यांचे सरकारबरोबरचे संबंधही दुरावलेलेच असतात. इतर धंदेवाल्याकडूनसुद्धा त्यांना पाठिंबा असा मिळत नाही. साहसी धंदेवाल्यांना नकोशा वाटणाऱ्या बऱ्याच गोष्टी मिळविण्याचा प्रयत्न मोठी कॉर्पोरेशन्स सारखी करीत असतात. पण या मोठ्या कॉर्पोरेशन्सची राजकीय घडामोडीत परिवर्तन घडवून आणण्याची सत्ता, पूर्वीच्या साहसी धंदेवाल्यापेक्षा बऱ्याच प्रमाणात कमी झाली आहे. त्याजबरोबर, त्यांच्या गरजांकडे पहाण्याचे जनतेचे धोरण त्यांना बरेचसे फायदेशीर बनत चालले आहे. हा योगायोग मात्र नाही; कारण औद्योगिक पद्धतीत व विशेषतः मोठ्या कॉर्पोरेशनमधली प्रत्यक्ष अशी राजकीय सत्ता जसजशी संपुष्टात आली, तसतशी अत्यंत महत्त्वाच्या सामाजिक कृत्यांवर परिणाम घडवून आणण्याच्या निरनिराळ्या पद्धती त्यांनी हस्तगत केल्या व त्यामुळेच समाजाचा त्यांच्या गरजांकडे पाहण्याचा दृष्टिकोण सहानुभूतीचा होत गेला. यावरून मोठ्या कॉर्पोरेशन्सचा सरकारसंबंधीचा दृष्टिकोण कसा उदात्त आहे याची खात्री पटते.

— क्रमशः







# राज्यशास्त्र व इतिहासमिमांसा

## भारतीय काँग्रेस एकपक्षीय लोकसत्त (५)

प्रा. श्री. प्र. सोहनी

दिनांक १६ ऑगस्टला राष्ट्रपतीपदाच्या निवडणुकीसाठी मतदान झाले. काँग्रेस संघटणेतील दोन्ही गट निर्णयाकडे डोळे लावून असले तरी दोन्ही गटांची पुढील संघर्षाची तयारी चालूच राहिली. मतदान सुरू असतानाच, राष्ट्रपतीनिवडणुकीच्या प्रश्नावरून काँग्रेस पक्षात फूट पाडण्यास कारणीभूत झाल्याच्या आरोपावरून जगजीवनराम आणि फकरुद्दिन अली अहमद यांच्यावर शिस्तभंगाची कारवाई करण्याची तयारी निजलिंगप्पांनी सुरू केली. देसाई, कामराज, पाटील आणि अतुल्य घोष या नेत्यांची निजलिंगप्पांच्या निवासस्थानी त्यावावत चर्चा झाली. चव्हाण आजारी असल्यामुळे या सभेला हजर नव्हते. मात्र त्यांच्या टीकाकारांनी चव्हाण कुंपणावर बसले आहेत असा त्याचा अर्थ लावला. फकरुद्दिन अली अहमद आणि जगजीवनराम यांच्यावर शिस्तभंगाची कारवाई केल्यावर, केंद्रीय सरकार स्थिर राहण्याच्या दृष्टीने काय करावयाचे याच्यावर याच बैठकीत खल करण्यात आला. बैठकीनंतर पाटील यांनी, काहीतरी कारवाई केली जाईल, पण पंतप्रधानांच्या वागण्यावरून तसे होईल असे वाटत नसले तरी आम्ही एकत्र कार्य करण्याचा प्रयत्न करू असे सांगितले. काँग्रेस पक्ष आपल्या निर्णयाला धरून राहिला यावावत त्यांनी समाधान व्यक्त केले. बंगलूरला निर्णय घेणे पुढे ढकला असे पंतप्रधानांनी सांगितले असते तर ती गोष्ट मान्य झाली असती असेही त्यांनी स्पष्ट केले.

दिनांक १६ ऑगस्टला ३० लोकसभासदस्य काँग्रेसअध्यक्षांना भेटले व त्यांनी पंतप्रधानांविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करावी अशी मागणी केली. दरम्यान पंजाव व चंदिगडहून अ. भा. कॉं.कमिटीच्या दहा सभासदांनी काँग्रेसअध्यक्षांना पत्र पाठवून त्यांच्यावरच्या अविश्वासाच्या ठरावाची चर्चा करण्यास अ. भा. कॉं. कमिटीची खास तातडीची बैठक घेण्याची विनंती केली. काँग्रेसअध्यक्षांनी देशातील प्रतिगामी शक्तींच्या मदतीने पंतप्रधानांना स्थानभ्रष्ट करण्याकरिता कट केला असा आरोप त्या ठरावात करण्यात आला होता. त्याचप्रमाणे काँग्रेस–अध्यक्षांनी जनसंघ व स्वतंत्र या पक्षांशी बोलणी केली या त्यांच्या कृतीचा विचार

करण्यासाठी अ. भा. कॉं.कमिटीची बैठक बोलवावी अशी मागणी बंगालच्या सभासदांनी केली.

तारकेश्वरी सिन्हा यांनी अध्यक्षांना पत्र लिहून दुसरा पक्षनेता निवडण्याची सूचना केली. पंतप्रधानांवर पक्षात दुफळी माजविण्याचा आरोप करून त्यांनी तीन प्रश्न उपस्थित केले.

जर संसदेमधल्या बहुसंख्य कॉंग्रेस सभासदांनी संजीव रेड्डींविरुद्ध मत देण्याचा पंतप्रधानांचा सल्ला मानला नाही, तर त्या पक्षाच्या नेत्या राहू शकतील का ?

जर संजीव रेड्डी निवडून आले तर कॉंग्रेस संघटनेने पंतप्रधानांना त्यांच्या पदावरून दूर करावयास नको का ?

जर बहुसंख्य कॉंग्रेस सदस्यांनी कॉंग्रेसच्या अधिकृत उमेदवाराला मत दिले नाही तर कॉंग्रेसअध्यक्ष पंतप्रधानांना पक्षनेता म्हणून दूर करून दुसरा नेता निवडतील का ?

तारकेश्वरी सिन्हा यांच्या मते पंतप्रधानांची प्रत्येक कृती कॉंग्रेसच्या अधिकृत उमेदवाराचा पराभव करण्याच्या उद्देशानेच केली गेली होती, त्यामुळे पक्षाची शिस्त ठेवण्यासाठी पक्षनेता म्हणून त्यांना दूर करणे हा एकच मार्ग होता.

१८ ऑगस्टला वर्किंग कमिटीची बैठक दिल्लीला होणार होती. पण त्या आधीच पाटील यांनी मुंबईला एक पत्रक काढले. राष्ट्रपतींच्या निवडणुकीचा निकाल कसाही लागला तरी कॉंग्रेस पक्षाचे दुरुस्त होण्यापलीकडे विघटन झाल्याचे, कॉंग्रेसला परत पूर्वस्थिती प्राप्त होणे शक्य नसल्याचे, पंडित नेहरू व त्यांचे सहकारी यांनी जी कॉंग्रेस वाढविण्याकरिता आणि सामर्थ्यवान करण्याकरिता सर्वस्व ओतले ती कॉंग्रेस विभाजित करण्यात पंतप्रधानांनी यश मिळविल्याचे, पंतप्रधान व त्यांचे दोन सहकारी यांनी कम्युनिस्टांचे व हिटलरचे प्रचारतंत्र वापरल्याचे, कॉंग्रेसला मुस्लीम मते मिळू नयेत म्हणून कोणीतरी दुष्ट बुद्धीने स्वतंत्र व जनसंघ या पक्षांबरोबर बोलणी केल्याचा खोटा आरोप केल्याचे, तसा प्रचार बऱ्याच अंशी सफल झाल्याचे व पंतप्रधानांच्या एक डझन मंत्र्यांनी तरी गिरींना मत देण्यासाठी संसदसभासदांवर दडपण आणल्याचे पत्रकात स्पष्ट केले होते. गिरी पंतप्रधानांचे उमेदवार आहेत, त्यांचा पराजय म्हणजे पंतप्रधानांचा पराभव असाही प्रचार केला गेल्याचे पत्रकात स्पष्ट केले होते.

१८ ऑगस्टला वर्किंग कमिटीची बैठक झालीच नाही. पेचप्रसंग मात्र आणखीच चिघळला कारण निजलिंगप्पांनी श्रीमती गांधी, जगजीवनराम आणि फकरुद्दिन अली अहमद यांना, त्यांच्या राष्ट्रपतींच्या निवडणुकीच्या वेळी झालेल्या वर्तनाबाबत खुलासा करावयास लिहिले. त्या तिघांना लिहिलेल्या पत्रात बंगलूर अधिवेशनापासून घडलेल्या गोष्टी निवेदन केल्या होत्या व त्यानंतर त्यांनी



अनुक्रमणिका



काँग्रेसच्या अधिकृत उमेदवाराविरुद्ध काम केल्याचा त्यांच्यावर आरोप केला होता व अशा प्रकारच्या कृतीनंतर पक्षात शिस्त कशी काय राहणार असा श्न उपस्थित केला होता.

ही सर्व कारवाई काँग्रेसअध्यक्ष, मोरारजी, कामराज व घोष यांच्यांत सल्लामसलत झाल्यानंतर करण्यात आली. राष्ट्रपतीनिवडणूक होऊन गेली होती, पण त्यावेळी पंतप्रधान व त्यांचे दोन सहकारी यांनी संघटनेला जी इजा केली होती, तिच्याविषयी आपल्या तीव्र भावना व्यक्त करण्याकरिता कमीत कमी पण काहीतरी कारवाई करणे आवश्यक होते असे या नेत्यांना वाटत होते. मुख्यतः मोरारजींच्या आग्रहामुळे खुलासा मागविण्यात आला.

यंग तुर्कींच्यामुळे या आधीच पंतप्रधान व चव्हाण यांची भेट झाली होती. दोन्ही गट एकत्र यावेत यासाठी आपण ही भेट घेतली असे चव्हाणांनी सांगितले, पण पंतप्रधानांच्या गटातील कोणीतरी व्यक्तीने, राष्ट्रपतींच्या निवडणुकीत पंतप्रधान व चव्हाण यांच्यात जे मतभेद झाले होते त्यांच्या संदर्भात ही भेट होती असे वृत्त प्रसृत केले. महाराष्ट्रातील काही खासदारांनी, निवडणुकीचा निर्णय लागण्यापूर्वीच पक्षातील एकी टिकविण्यासाठी काहीतरी समझौता घडून यावा असे प्रयत्न चालविले होते. दोन्ही गटांना निर्णय काय होणार याचा अंदाज नव्हता व म्हणून दोन्ही गट बचावाचे धोरण स्वीकारण्याच्या मनःस्थितीत होते असे वाटत होते, पण तो आभास होता. पंतप्रधानानी यावेळी मध्यप्रदेश, बिहार, राजस्थान, पंजाब आणि काश्मीर इत्यादी सातआठ राज्यांतील खासदारांच्या भेटी घेऊन त्यांना पेचप्रसंग कसा निर्माण झाला व तो कसा वाढला याची माहिती देत होत्या.

पंतप्रधानानी त्याच दिवशी सर्व काँग्रेससदस्यांना एका पत्रकान्वये, जनतेत काँग्रेसला आपले स्थान परत मिळवावयाचे असेल तर विचार करणारे, विचार व्यक्त करणारे व त्यानुसार ध्येयपूर्तीसाठी एकात्मतेने कार्य करणारे नेतृत्व निर्माण केले पाहिजे असे आवाहन केले. त्या पत्रकाचा मतितार्थ असा होता: काँग्रेस पक्ष गेले काही आठवडे एका मानसिक दुःस्थितीतून जात आहे. राष्ट्रपतीनिवडणुकीत पक्षातील ज्येष्ठ नेत्यांनी भिन्न दृष्टिकोन स्वीकारले व त्यामुळे सभासदांच्या मनात गोंधळ निर्माण झाला.

हा सत्तासंघर्ष आणि व्यक्तिमत्वांचा संघर्ष आहे असे म्हटले जाते, पण पक्षातले मतभेद त्यापेक्षा जास्त खोलवर जाणारे, महत्वाचे आणि देशासमोरच्या समस्या आणि कार्यक्रम याबाबत दृष्टिकोनाविषयी आहेत. ते संघटनेत अनेक दिवसांपासून आहेत, मात्र निवडणुकीच्या निमित्ताने स्पष्ट झाले आहेत.



अनुक्रमणिका

यावेळी उपस्थित झालेले प्रश्न राष्ट्रपती-निवडणुकीपलीकडे जाणारे आहेत असे मला वाटते. निवडणुकीचा निकाल कसाही लागला, तरी त्यामुळे लोकशाही, धर्मनिरपेक्षता, समाजवाद व तटस्थता ही आपली मूलभूत धोरणे कशी अंमलात आणावी, अंमलात आणण्याच्या कोणत्या पद्धती असाव्यात यावावतीतील मतभेद नाहीसे होणार नाहीत. आपल्या आर्थिक धोरणाचा भावी कालातील मार्ग कसा असावा याविषयी पक्षात स्थूलमानाने एकमत आहे. बंगलूरचा ठराव संघटनेतील बहुसंख्यांकांच्या सर्वसाधारण मताचे प्रतिबिंब होते. पण आता आपल्याला आत्मपरीक्षण करावयाचे आहे, पक्षाच्या कार्याचे जाणीवपूर्वक पुर्नविलोकन व परीक्षण करावयाचे आहे आणि मूलभूत धोरणे अंमलात आणण्यासाठी पद्धती निर्मावयाच्या आहेत.

पण हा प्रश्न फक्त शासकीय कृतीचा वा कायदे करण्याचा नाही, तर पक्षसंघटनेने सर्व पातळयावर सहभागी होऊन त्या कार्याला वाहून घेण्याचा आहे. फक्त शासकीय कृती व कायदे करणे यांनी सामाजिक बदल घडून येत नाहीत आणि आपण तर आपली मूलभूत धोरणे लोकशाही पद्धतीने अंमलात आणून सामाजिक बदल घडवून आणण्याच्या प्रयत्नात आहोत.

पण दुर्दैवाने गेली काही वर्षे आपल्या संघटनेतील जनतेच्या प्रवृत्तीत आणि विचारात बदल घडवून आणण्यास आवश्यक असलेली गतिमानता आणि काहीतरी सातत्याने करण्याची वृत्ती कमी झाली आहे, जनतेशी आणि प्रामुख्याने युवकांशी पक्षाचा संपर्क सुटत चालला आहे, जनतेच्या सुखदुःखात आम्ही सहभागी होत नाही असे दिसून आले आहे व स्वातंत्र्यसंग्रामाच्या वेळी दृष्टोत्पत्तीस येणारी मिशनरी वृत्ती संघटनेतून नाहीशी झाल्यासारखे वाटत आहे.

बँकांचे राष्ट्रीयीकरण करण्याचा अत्यंत महत्त्वाचा निर्णय घेतल्यानंतर, बेकारी आणि लाखोंना भोगावे लागणारे दारिद्रय नाहीसे करण्याचे प्रयत्न नेटाने करण्यात येतील अशी भावना सामान्यांच्या मनात निर्माण झाली. पण या नव्या परिस्थितीचा फायदा घेण्यात आणि सामाजिक कार्यक्रम अंमलात आणण्यात पक्षपातळीवर आपल्याला कितीसे यश आले ? वास्तविक हे पाऊल पूर्णतया आपण उचलले आहे, पण काहीजण सोडले तर पक्षातील इतरांनी तिकडे फारसे लक्ष दिले नाही; याउलट विरोधी पक्ष त्याचे श्रेय घेत आहेत, सभा भरवीत आहेत आणि मोर्चे काढीत आहेत.

मात्र काही लोकांनी कम्युनिझमच्या प्रभावाचा बागुलबुवा उभा करण्यासाठी त्याचा फायदा घेतला. इतर देशातले अनुभव याच प्रकारचे आहेत. कोणत्याही प्रागतिक अशा सामाजिक वा आर्थिक सुधारणेमुळे हितसंबंधियात आणि पुराणमतवाद्यात अशी प्रतिक्रिया निर्माण होते. कम्युनिझमचा तसा प्रभाव येथे नाही असे मला माझ्या पक्षातील सहकाऱ्यांना स्पष्ट सांगावयाचे आहे. पक्ष







या नात्याने लोकशाही आणि लोकशाही पद्धती यावर आमची श्रद्धा आहे. तो आपला आधार आहे व या मूलभूत दृष्टिकोनाला आपण दृढरीतीने धरून राहणार आहोत. या सर्वांचा विचार करा असे मला प्रत्येक कॉंग्रेस-सभासदाला सांगावयाचे आहे. लोकमत तयार करण्याचे एक प्रभावी साधन म्हणून पक्षाचे पुनरुत्थान करून पक्षात नवचैतन्य कसे आणणार आहोत ? आणि त्याचवेळी सामाजिक बदल घडवून आणण्याच्या दृष्टीने आवश्यक अशी परिस्थिती कशी निर्माण करणार आहोत ? आपण तसे केले नाही तर प्रस्थापित हितसंबंधी आणि प्रतिगामी परिस्थितीवर तावा मिळवितोल आणि प्रगतीला अडथळे आणतील.

जाणते व ज्येष्ठ कॉंग्रेसजन पक्षाच्या स्वीकृत धोरणाबाबत भिन्न भूमिका घेतात त्यावेळी गोंधळ निर्माण होऊन संघटनेच्या निरनिराळ्या पातळ्यांवर निष्क्रियता येते. ही परिस्थिती नेते आणि अनुयायी यांनी संघटनेत एकत्रित काम केल्यानेच सुधारता येईल–तसे कार्य शासकीय आणि पक्षीय पातळीवर करावे लागेल. संघभावनेने असे कार्य करणारे कार्यकर्ते निष्ठावान् व त्या कार्याला वाहून घेणारे असतील, त्यांचा मूलभूत धोरणांवर विश्वास असेल, तसेच आपण दिलेली वचने आणि आश्वासने जलदीने प्रत्यक्षात उतरविण्यासाठी ते सातत्याने सहकार्य करतील. अशा प्रकारच्या एकनिष्ठ, एकसंध व समान ध्येय असणाऱ्या नेतृत्वाने कॉंग्रेसमध्यें नवचैतन्य येईल व तशी कॉंग्रेसच सामाजिक आणि आर्थिक धोरणे नीटपणें अंमलात आणू शकेल. समान विचार आणि दृष्टिकोन नसतील तर पक्ष आणि शासन या दोघांनाही प्रगती करता येत नाही.

पक्षाचे पुनरुज्जीवन करण्यासाठी मी तुमचे संपूर्ण सहकार्य मागत आहे. व्यक्ती कोणी का असेनात, कॉंग्रेसला जनतेत जर परत स्थान मिळवावयाचे असेल, तर तिला विचार करणारे, ते विचार व्यक्त करणारे आणि एका ध्येयाने कृती करणारे नेतृत्व निर्माण करावयास हवे.

गेल्या काही आठवड्यातील घडामोडींनो परस्पर अविश्वास व दोषारोप–प्रत्यारोपांचे वातावरण निर्माण झाले आहे. हे सर्व थांबविण्याचा आपण निश्चयपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. जी एकता आपण निर्माण करणार आहोत, ती एकता धोरणे व कार्यक्रम यावर आधारित हवी व ती एकता आपण भारतीय जनतेला जबाबदार आहोत या आधारावर हवी. एक नवे द्वार आपल्यासमोर उघडले आहे व आपल्या देशातील लाखो श्रमिकांना एक नवा मार्ग खुला झाला आहे.

आपल्या संघटनेच्या सामर्थ्यावर माझा विश्वास आहे व नव्या परिस्थितीला तोंड देण्यासाठी त्या संघटनेत अपरिमित कुवत आहे हे मला माहीत आहे. म्हणून आपण खांद्यालाखांदा लावून आपल्या देशाच्या आणि जनतेच्या सेवेसाठी जी नवी ध्येये डोळयांसमोर ठेवली आहेत त्यांच्याकडे वेगाने मार्गक्रमण करू या.



अनुक्रमणिका



पंतप्रधानांच्या या आवाहनाने दोन्ही गट जवळ येणे जास्त कठीण होणार होते, कारण निजलिंगप्पांनी, घोष, देसाई, कामराज, अशोक मेहता व मिश्रा इत्यादींशी बातचीत केल्यावर काढलेल्या एका पत्रकात पक्षातिल शिस्त व लोकशाही पद्धती टिकविण्याचा आपला निर्धार व कोणत्याही प्रकारे माघार न घेण्याचा आपला निश्चय व्यक्त केला होता. ते सर्व काही विसरून जावयाला तयार होते पण संघटनेचा दृष्टिकोन काय असेल याबाबत त्यांना काही सांगता येणार नव्हते. पक्षाचा नेता एक बोलतो व निराळ्या तऱ्हेने वागतो ही वर्तमान-काळातील सर्वात मोठी दुःखान्तिका असून, अशा प्रकारचा अंतर्विरोध दूर केल्याशिवाय कॉंग्रेससारख्या महान पक्षात एकी होणे कठोण आहे असेही त्यांनी नमूद केले होते. पंतप्रधान व कॉंग्रेसचे अध्यक्ष यांची पत्रके पाहता ऐक्य निर्माण होणे कठीण असे स्पष्ट दिसत होते.

राष्ट्रपतींच्या निवडणुकीचा निकाल अजून लागावयाचा होता, पण तो लागण्याआधी आपापली भूमिका स्पष्ट करण्याचा दोन्हो गटांचा प्रयत्न जोमाने सुरू होता. निवडणुकीचा संभाव्य निकाल काय लागेल याचा अंदाज करणे कठीण होते. त्यामुळे संभाव्य प्रतिक्रिया लक्षात घेऊन त्यावर मतप्रदर्शन सुरू होते.

राष्ट्रपती-निवडणुकीच्या वेळच्या वर्तनाबाबत केंद्रातील आणि राज्यातील पक्षसभासदांवर शिस्तभंगाची कारवाई करण्यात आली तर त्याचे कॉंग्रेसवर विघातक परिणाम घडतील व ते प्रकरण तेथेच थांबणार नाही असे पंतप्रधानांनी आपली त्याबाबतची प्रतिक्रिया व्यक्त करताना सांगितले. सात राज्यातल्या खासदारांसमोर बोलतांना, "आम्हाला पक्षात फूट पाडावयाची नाही, आम्हाला पक्ष सोडावयाचा नाही, कोणालाही कॉंग्रेस सोडून जावे लागावे वा कोणालाही बाहेर घालविले जावे असे आम्हाला वाटत नाही, आम्हाला एकता हवी आहे," असे त्यांनी उद्गार काढले; पण लगोलग शिस्त या शब्दाचा संकुचित अर्थ घेतला जाऊ नये अथवा एकांगी अर्थ घेतला जाऊ नये, कोणाच्याही पाठीमागे कारवाया केल्या जाऊ नयेत व सर्व वादविवाद वा चर्चा उघडपणे व्हावी असेही त्यांनी स्पष्ट केले.

बंगलोरला राष्ट्रपती उमेदवाराच्या प्रश्नांत, वाटल्यास मान्य करा नाहीतर सोडून द्या अशी परिस्थिती आपल्यावर लादण्यात आली; वास्तविक अध्यक्षांनी नावाबाबतची चर्चा दिल्लीला होईल असे आश्वासन दिले होते. पण सभेत मात्र वृत्तपत्रकार नावाची घोषणा व्हावी असा आग्रह करीत असल्याच्या सबबीवर निर्णय घेण्यात आला; फक्त पाच मिनिटात निर्णय होईल असे पाटील यांनी सांगितल्याचे पंतप्रधानांनी प्रकट केले. मोरारजींनी प्रथम उमेदवार हरिजन असावा याला संमती दिली होती; त्यावेळी आपण जगजीवनराम व संजीवय्या ही दोन नावे सुचविली होती; चव्हाणांचे मतही तसेच असावे असे आपल्याला वाटले होते;

आपण जगजीवनरामांचे नाव सुचविले तरी सक्रिय राजकारणापासून त्यांचा संबंध सुटू नये असे आपल्याला वाटत होते; मोरारजी पूर्वी गिरींच्या वयस्करपणामुळे त्यांच्या बाजूने नव्हते पण मागाहून त्यांचा विरोध नाहीसा झाला होता इत्यादि माहिती त्यांनी प्रकट केली. शेवटी कोणीही निवडून आले तरी मतदारांचा निर्णय मानून सर्वांनी राष्ट्रपतीपदाची प्रतिष्ठा राखावी अशी त्यांनी विनंती केली.

पक्षाचे विघटन होऊन दुफळी झाल्यास आपले नुकसान होईल असे वाटणाऱ्या राज्यनेत्यांनी एकीचे प्रयत्न चालू ठेविले. हैद्राबादचे मुख्यमंत्री ब्रह्मानंद रेड्डी व काँग्रेसचे अध्यक्ष वेंकटरत्नम् यांनी केन्द्रीय नेतृत्वातील दुर्दैवी मतभेद नाहीसे होऊन देशहितासाठी ऐक्य राखले जावे अशी आशा व्यक्त केली. महाराष्ट्राच्या मुख्यमंत्र्यांनी काँग्रेसमधील दुही टाळण्यासाठी आपल्याला सर्व प्रकारचे यत्न करावे लागतील–तोच फक्त एक मार्ग आहे असे उद्‌गार काढले.

निवडणुकीच्या निकालाच्या आदल्या दिवशी पंतप्रधानांनी खासदारांच्या एका सभेत भाषण केले. कोणत्याही ज्येष्ठ नेत्याचा अवमान करण्याची आपली कधीच इच्छा नव्हती असे स्पष्ट सांगून, काँग्रेस संसदीय पक्षाला डावलून केलेली निजलिंगप्पांची कृती कितपत योग्य होती असा प्रश्न त्यांनी उपस्थित केला व पुढे काय होणार ते आपल्याला कळत नाही असे त्या म्हणाल्या. पण त्या जे बोलल्या नाहीत ते जगजीवनराम व फकरुद्दिन यांनी सांगून टाकले. जगजीवनरामांनीं शिस्तीबाबत दोन मानदंड लावल्याची तक्रार केली आणि आपल्याला खुलासा विचारल्याबाबतचा प्रश्न आपण काँग्रेसच्या चार हजार प्रतिनिधींसमोर नेऊ अशी धमकी दिली. " पक्षाचे धोरण ठरविणाऱ्या प्रतिनिधींकडे आपण हा प्रश्न नेऊ या; प्रतिनिधींनी घेतलेले निर्णय जे मोडतात त्यांच्याविरुद्ध कारवाई करू या; खरी काँग्रेस आपण आपल्याबरोबर नेणार आहोत, जनता आपल्या पाठीशी आहे, " हे त्यांचे उद्‌गार होते.

निजलिंगप्पांना मतदानात शिस्त हवी होती पण पक्षाच्या मूळ धोरणाला हरताळ फासणाऱ्यांवर कारवाई करावयाची नव्हती अशी टीका त्यांनी केली. ( ही टीका पाटील यांच्याविरुद्ध होती हे उघड होते. ) फकरुद्दीन त्याच पद्धतीने बोलले. काँग्रेसची आणि पंतप्रधानांची प्रतिष्ठा कमी करण्याच्या प्रयत्नाला जबाबदार असलेल्यांविरुद्ध कारवाई करण्यात आली नाही याबाबत त्यांनी तक्रार केली. निवडणुकीत जातीयतेला आवाहन केल्याबाबत त्यांनी पाटील यांच्यावर कडक आक्षेप घेतला आणि अशा लोकांमुळे पक्षाचा विनाश होतो अशी टीका केली.

पंतप्रधानांनी नुसते व्हिप काढून शिस्त पाळली जात नाही, तर त्यासाठी सर्वसामान्य धोरणे व कार्यक्रम असावे लागतात अशी पुस्ती जोडली. पक्षाच्या स्वीकृत धोरणापासून दूर जाणे पंडित नेहरूंच्या शेवटच्या दिवसात सुरू झाल्याचे



अनुक्रमणिका

सांगून, त्यामुळे नेहरूंना मनस्ताप सहन करावा लागल्याची माहिती देऊन, काँग्रेस ज्या मार्गाने जावी असे महात्माजींना आणि नेहरूंना वाटत होते, त्या मार्गापासून ढळली असल्याचे वाटते असे त्यांनी प्रतिपादन केले.

पंतप्रधान या नात्याने आपल्याला अनेक वेळा अवमान सोसावा लागला आणि जबाबदारी टाकण्यात आली पण निर्णय घेण्याचा अधिकार मात्र देण्यात आला नाही अशी तक्रार त्यांनी सभासदांसमोर मांडली. त्यांनी बंगलोरचेच उदाहरण दिले. बंगलोरला उमेदवाराची निवड सहज झाली नाही; पूर्वनियोजित योजनेमुळे इतक्या काटेकोरपणाने गोष्टी होऊ शकल्या; निर्णय घेतल्यावरोवर काही मिनिटांच्या आतच मतांसह जाहीर केला गेला व त्यामुळे पंतप्रधानांना त्यांच्याच संघटनेत खाली खेचण्यात आले अशी भावना सर्वत्र पसरल्याचे त्यांनी सांगितले. पक्षप्रमुख अशा पद्धतीने पक्षात अवमानित झाला तर लोकशाही कधीच टिकणार नाही असे स्पष्ट मत त्यांनी व्यक्त केले. पंतप्रधान म्हणून आपले स्थान धोक्यात आले असे वाटले म्हणून नव्हे, तर पंतप्रधान या पदाचे महत्त्व कमी व्हावयास लागले म्हणून आपल्याला असे वागण्याची वेळ आली, पंतप्रधानाला स्वतःचे स्थान असले पाहिजे; फक्त कम्युनिस्ट राजवटीत पक्ष शासनापेक्षा वरिष्ठ असतो; पण लोकशाहीत निवडणुका असल्यामुळे लोकनियुक्त प्रतिनिधी मोठे असतात असे त्या म्हणाल्या.

राष्ट्रपती आणि पंतप्रधान यांना दैनंदिन कारभार सहकार्याने चालवावा लागतो; म्हणून राष्ट्रपतींच्या निवडीत पंतप्रधानांना त्यांचे मत विचारणे आवश्यक वाटते असे मत व्यक्त करून त्यामुळे आपण अवमानित झालो असे आपल्याला वाटल्याचे त्यांनी स्पष्ट केले. आपण साम्यवादी मनोवृत्तीकडे हळूहळू झुकत आहोत याचा त्यांनी इन्कार केला.

प्रत्यक्षात पंतप्रधान आणि निजलिंगप्पा खासदारांच्या दोन निरनिराळ्या गटांशी बातचीत करीत होते व त्यावरून पक्षात फूट पडणार असे निश्चित दिसत होते. मुंबईची भेट रद्द करून चव्हाणांनी दोन्ही गट एकत्र आणण्याचे प्रयत्न सुरू ठेवले. काँग्रेस-अध्यक्ष व पंतप्रधान यांची भेट होऊन त्यांनी सर्व प्रश्नाची चर्चा करावी अशी चव्हाणांनी कल्पना मांडली ( आम्ही चंद्रावर गेल्यावर बहुधा ही बैठक होईल असे उद्‌गार अध्यक्षांनी काढले. ) काँग्रेसचे अध्यक्ष व त्यांचा गट शिस्त-पालनाची भाषा बोलत होते, तर पंतप्रधान व त्यांचा गट पक्षातील एकी आणि शांतता यांचा घोष करीत होते. अध्यक्ष परत परत संघटना हादरविण्याचा प्रयत्न करणारांना क्षमा केली जाणार नाही असे सांगत होते — अशा परिस्थितीत एकी होणे दुरापास्त वाटत होते.

इतर नेतेही आपापल्या मतप्रदर्शनाने गोंधळात भर घालीत होते. खुलासा मागणारी पत्रे अध्यक्षांनी परत घ्यावी असे सुब्रह्मण्यम् यांनी सुचविले —



अनुक्रमणिका



निजलिंगप्पांनी ती सूचना फेटाळली. आर्थिक कार्यक्रम अमान्य केल्यास वा तो अंमलात आणण्यास नकार दिल्यास पंतप्रधानांनी मोरारजींकडून अर्थखाते आपल्याकडे घ्यावे असे आपण म्हटले होते; पण पंतप्रधानांनी त्यावर केलेल्या वक्तव्यामुळे गैरसमज होण्याचा संभव होता असे जाहीर करून, कामराजांनी मोरारजींना अनावश्यक व अरेरावी पद्धतीने काढले गेले अशी टीका केली व मोरारजींना त्यांच्या कार्याबद्दल धन्यवाद दिले.

जगजीवनरामांना विरोध करण्याचे सबळ कारण होते पण ते जाहीर करण्याची इच्छा नव्हती. राष्ट्रीयीकरण हे काही कम्युनिस्ट स्लोगन नव्हते; मात्र पक्षातील बेशिस्त हा एक गंभीर मामला होता असे मत मोरारजींनी व्यक्त केले. एस्. एन्. मिश्रांनी कॉंग्रेसमध्ये ऐक्य टिकविण्यासाठी पंतप्रधानांनी खेद व्यक्त करून संघटनेला पूर्णतया मानावे असा सल्ला दिला. नंदांनी कॉंग्रेस-अध्यक्ष एका गटाचे असल्यामुळे त्यांच्याकडून सर्व कॉंग्रेसच्या हिताचा विचार होत नाही अशी टीका केली.

## गिरी विजयी होतात :

दिनांक एकोणीसला रात्री निवडणुकीचा निकाल लागून श्री. गिरी निवडून आल्याचे जाहीर झाले. स्वतः श्री. गिरींनी आपल्या विजयाचे लोकशाही परंपरेचा विजय असे वर्णन केले. निजलिंगप्पांनी गिरींचे अभिनंदन केले, पण अनेक कॉंग्रेसजनांनी आपले कर्तव्य न केल्याबाबत खेद व्यक्त केला. गिरींचा विजय म्हणजे पंतप्रधान गटाचा विजय असल्यामुळे, सांसदीय पक्षातील अनेक कॉंग्रेस-सदस्य त्या गटात जातील व त्यामुळे पंतप्रधानांना आपल्या टीकाकारांना व विरोधकांना कॉंग्रेस पक्षातून आणि शासनातून हुसकावून लावणे सुलभ होईल अशी कल्पना प्रसृत झाली.

गिरींच्या विजयाबाबत भिन्नभिन्न प्रतिक्रिया व्यक्त झाल्या. गिरींच्या पुरस्कर्त्यांनी तो जनतेचा विजय मानला. "आम्ही जे म्हणत होतो ते बरोबर होते याचा हा पुरावा असून, देश आमच्या पाठीमागे आहे असा त्याचा अर्थ आहे." असे मत जगजीवनरामांनी व्यक्त केले. (श्री. गिरी मतमोजणीच्या दुसऱ्या फेरीत विजयी झाले होते.) त्यांनी दर्शविलेल्या गोष्टी लोकांना पटल्या यात फकरुद्दिन यांना समाधान वाटले. निर्णयाबाबत मेनन यांनी समाधान व्यक्त केले आणि गिरी जनतेचे राष्ट्रपती आहेत असे त्यांचे वर्णन केले. मत नसतानाही जनतेने निवडणुकीत विचारपूर्वक आणि उत्साहाने लक्ष घातले या गोष्टीचे त्यांनी स्वागत केले. उजवी प्रतिगामी शक्ती पळू लागली आहे, सर्व प्रगतीशील पुरोगामी शक्तींनी तिचा नाश केला पाहिजे असे भूपेश गुप्तांनी आवाहन केले. घटना पाळून श्री. गिरी आपले कर्तव्य पार पाडतील अशी आशा

व्यक्त करून वाजपेईंनी सर्व देशाच्या सदिच्छा व्यक्त केल्या. मसानींनी मात्र 'आता देवच देशाला तारो' असे उद्‌गार काढले. आमच्या राष्ट्रीय जीवनातील श्री. गिरी ही फार मोठी व्यक्ती असल्याचे सांगून पंतप्रधानांनी त्यांचे अभिनंदन केले व व्यक्तिशः आपण व आपले सरकार त्यांना संपूर्ण सहकार्य देईल असे जाहीर केले.

## काँग्रेस अध्यक्षांच्या हालचाली :

चालू परिस्थितीचा विचार करण्याकरिता आपण वर्किंग कमिटीची बैठक बोलावणार आहोत असे वार्ताहरांना सांगून, रेड्डींच्या पराभवाला जे कारणीभूत होते त्यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करण्याचा आपण गंभीरपणे प्रयत्न करणार असल्याचे निजलिंगप्पांनी जाहीर केले. अधिकृत उमेदवाराचा पराभव झाल्यामुळे श्रीमती गांधींनी काँग्रेस सांसदीय पक्षाचे प्रमुखपदी राहणे योग्य होईल का अशा प्रश्नाला, तोही प्रश्न वर्किंग कमिटीत विचारात घेतला जाईल असे त्यांनी उत्तर दिले.

अधिकृत उमेदवाराचा पराभव करण्याकरता अतिशय दबाव आणला गेल्यामुळे निकाल काय लागणार याची अंधुक कल्पना होतीच, त्यामुळे निकालामुळे आपल्याला फारसे आश्चर्य वाटले नाही असे ते म्हणाले. काँग्रेसच्या इतिहासातील हा एक दुःखद दिन आहे असे सांगून, या निवडणुकीमुळे शिस्त राखून संघटनेशी निष्ठेने वागणारी सदस्यसंख्या कायम ठेवण्याचे कार्य आपल्याला करावे लागेल अशी कल्पना त्यांनी मांडली. या अपयशामुळे काँग्रेसमध्ये फूट पडेल का असा प्रश्न विचारला गेला त्याला अजूनही ऐक्य राखल्यास आणि शिस्त ठेवल्यास काँग्रेस या परिस्थितीतून बाहेर पडू शकेल असे त्यांनी उत्तर दिले.

पंतप्रधान आणि त्यांचे दोन सहकारी यांना त्यांच्या जागेवरून तात्पुरते दूर करावे अशा प्रकारची योजना काँग्रेस-अध्यक्ष व त्यांचा गट यांजकडून सुचविली जाईल अशी कल्पना होती. २१ ऑगस्टला निजलिंगप्पांच्या घरी झालेल्या बैठकीत घोष, कामराज, देसाई व पाटील इत्यादि नेत्यांनी तसा निर्णय घेतला. चव्हाण या बैठकीला हजर नव्हते. मात्र चव्हाण व नाईक यांनी अध्यक्षाना भेटून ऐक्य टिकविण्याच्या सर्व मार्गांचा विचार केल्याशिवाय घाईगर्दीने कोणताही निर्णय घेतला जाऊ नये अशी सूचना केली.

पंतप्रधान आणि त्यांचे सहकारी यांनी खुलासा विचारणाऱ्या पत्राला अजूनपर्यंत उत्तर दिले नव्हते. त्याचा अर्थ स्पष्ट होता. सर्व ज्येष्ठ पुढाऱ्यांनी याबाबत तीव्र संताप व्यक्त केला. त्या सर्वांनी बेशिस्तीच्या मुद्द्यावर बोट ठेवले. पक्षाचे नेतृत्व बेशिस्त असल्यास संघटना कोसळून पडेल असे त्यांचे मत पडले. बेशिस्त मान्य करण्यापेक्षा पक्षच गुंडाळला तर बरे असे एका नेत्याने



अनुक्रमणिका



उद्गार काढले. देसाईंना तर पंतप्रधानांचे काँग्रेसचे सभासदत्व स्थगित करावे असे वाटत होते—तसे केल्यास आपोआपच त्या सांसदीय पक्षप्रमुख राहिल्या नसत्या. शासन स्थिर राहील का नाही हा प्रश्न त्यांच्यासमोर नव्हता—असण्याचे प्रयोजन नव्हते—कारण सरकारचे नियंत्रण केव्हाच त्यांच्या हातावाहेर गेले होते. काही सभासदांनी जशास तसे धोरण स्वीकारावे असे सुचविले व संसदेत मतस्वातंत्र्याची मुभा मागितली. मतस्वातंत्र्याची चव—सरकारचा पराभव होण्याच्या संभवामुळे—त्यामुळे पंतप्रधानांना कळेल असे त्यांचे मत पडले. चव्हाणगटाला मात्र पक्षात फूट पडावयाला नको होती; मध्यममार्ग स्वीकारून समझोता व्हावा असे त्या गटाला वाटत होते, पण तो गट कोणत्याही प्रकारची उपाययोजना सुचवीत नव्हता.

वर्किंग कमिटी काय कारवाई करते यावर सर्व काही अवलंबून होते. सिंडिकेट गटाचे मत कायम होते, पण त्या गटाने सौम्य उपाय सुचवावे यासाठी चव्हाणांचे प्रयत्न सुरु होते; तडजोडवादी कडक कारवाईमुळे संघटनेवर काय परिणाम होतील याचा विचार करीत होते; सांसदीय पक्षातील एखाद्या गटाने पंतप्रधानांच्या नेतृत्वाला आक्षेप घेतला तर संसद बरखास्त करावी लागेल अशी त्यांना भीती वाटत होती. पण याचवेळी १३० खासदारांचा एक गट—(ही संख्या इतकी मोठी असेल असे मागाहून घडलेल्या घटनांवरून वाटत नाही.)—पंतप्रधानांची कृती क्षम्य मानावयास तयार नव्हता. काँग्रेसच्या अंतर्गत काही शक्ती आणि काँग्रेसबाहेरच्या काही बिगर—लोकशाही व जातीय शक्ती यांची युती त्रासदायक ठरेल असे या गटाला वाटत होते. वर्किंग कमिटीने कोणतीही कारवाई न केल्यास तो गट आपला मार्ग स्वीकारण्याच्या विचारात होता. (त्या गटाच्या मनात यंग तुर्क, कम्युनिस्ट आणि मुस्लीम लीग यांची युती होतो हे स्पष्ट होते.)

सिंडिकेट नेत्यांच्या व पंतप्रधानगटाच्या बैठकी सुरूच होत्या. निजलिंगप्पांना अनेक प्रकारचे प्रश्न विचारले जात होते. १९७२ पर्यंत पंतप्रधान आपल्या स्थानावर राहतील का या प्रश्नाला, त्याबाबत आता काहीच सांगता येत नाही असे त्यांच्याकडून उत्तर मिळाले. चव्हाण तडजोडीचा प्रयत्न करीत होते हे अध्यक्षांनी मान्य केले; ते शिस्तीच्या बाजूने असावेत असेही सांगितले. काही प्रश्नांबाबत मात्र त्यांनी स्पष्ट शब्दात मतप्रदर्शन केले. "संघटनेतील शिस्तीला मी प्राथम्य देणार आहे; काँग्रेसची शिस्त व प्रतिष्ठा यांना धक्का लागेल अशी कोणतीही तडजोड मी मान्य करणार नाही; काँग्रेसमध्ये फूट पडली तरी काँग्रेस बलवान बनेल, कारण ज्यांना काँग्रेसची शिस्त मान्य आहे तेच फक्त आत राहतील" असे ते म्हणाले. राज्यातील जवळजवळ ऐंशी टक्के मतदारांनी रेड्डींना मत दिले यावरून त्यांना तशी आशा वाटत होती. केंद्रांतील दीडशेहून अधिक मतदार विरोधी गटाला मिळाले असा त्यांचा अंदाज होता. कम्युनिस्ट गिरींचा विजय आपलाच मानीत होते व काही काँग्रेससभासद अजाणतेपणाने कम्युनिस्टांच्या आहारी जात होते असे

आपले मत त्यांनी प्रकट केले. काँग्रेस एक संघटना म्हणून जगावयास हवी असेल, स्थिर सरकार हवे असेल तर शिस्त पाळली गेलीच पाहिजे असा त्यांचा आग्रह होता.

आपल्या गटाला सिंडिकेट म्हटल्याबाबत त्यांनी तीव्र संताप व्यक्त केला. " सिंडिकेट म्हणजे कोण ? ते केव्हा स्थापन झाले ? हा प्रचार अगदी गोवेल्सच्या वळणावर आहे. सिंडिकेटचे सभासद प्रतिगामी मानले जातात ! हा शब्द कोणातरी कल्पक माणसाने तयार केला असला पाहिजे. काँग्रेसमधील काही लोकांविरुद्ध शस्त्र म्हणून हा शब्द वापरला जात आहे. कामराज प्रतिगामी आहेत का ? जनतेसमोर हा शब्द नाचविला जात आहे तो का ? सिंडिकेटने असे काय केले आहे ? " वरील शब्दात त्यांचा संताप व्यक्त झाला होता. त्यांच्या गटातील इतर नेते शिस्तीबाबत आग्रही होते.

संसदेतील २४८ सभासदांची एक बैठक संजीवय्यांच्या निवासस्थानी भरली. या बैठकीत पंतप्रधानांवर विश्वास व्यक्त करण्यात आला, एकीचे आवाहन करण्यात आले, पण पंतप्रधानांविरुद्ध कारवाई केली गेल्यास त्याविरुद्ध पूर्ण शक्तीनिशी लढा देण्याचा निर्णय घेण्यात आला. चंद्रजित यादव यांच्या गटाने अध्यक्षांच्या राजिनाम्याची मागणी केली. याउलट ६२ सभासदांच्या दुसऱ्या एका बैठकीत नवा पक्षनेता निवडावा अशी मागणी झाली.

कामराजांनी एकीची आवश्यकता प्रतिपादन करताना देशाची एकात्मता टिकविण्यासाठी किमान वीस वर्षे तरी काँग्रेस अभंग राहिली पाहिजे असे सांगून संघटनेवर आलेली ही आपत्ती देशाला विघातक ठरेल, एकदा काँग्रेसचे विघटन झाले, आणि केंद्रातील तिची सत्ता नाहीशी झाली तर देशाचें विघटन होईल, विघटन थांबविण्यासाठी काय करावयाचें ते फक्त वर्किंग कमिटीच ठरवू शकेल असे विचार मांडले.

२५ ऑगस्टला एका सभेत बोलताना पंतप्रधानांनी आपली भूमिका अधिक स्पष्ट केली. तत्वासाठी झगडताना आपण आपले पदाधिकारच नव्हे तर इतरही अनेक गोष्टी पणास लावल्याचे स्पष्ट करून, ज्या तत्वावर काँग्रेस आधारित होती त्या तत्वांचा त्याग करून एकता निर्माण्यास आपण तयार नसल्याचे त्यांनी स्पष्ट केले. जी कृती केल्यामुळे त्यांच्यावर टीका होत होती ती कृती वस्तुतः अत्यंत आवश्यक होती; राष्ट्रीयीकरणाची भाषा पंधरा वर्षे सुरू होती, पण अ. भा. काँ. कमिटीत त्याविरुद्ध कोणीही बोलले नव्हते; मात्र ती कृती केल्यावरोबर आपल्याला कम्युनिस्ट म्हणण्यात आले असे त्यानी उद्‌गार काढले. काँग्रेस संघटना काही थोडी माणसे चालवितात अशी समजूत झाल्यामुळे तशी काँग्रेसची सर्वत्र कीर्ती झाल्यामुळे काँग्रेसला धक्के खावे लागले, निवडणुका हराव्या लागल्या व तिने जनतेचा विश्वास गमविला; काँग्रेस ही, मूठभर लोकांची नसून



अनुक्रमणिका



आम जनतेची आहे, तिच्यात गटबाजीला जागा नाही असे आपले ठाम मत त्यांनी प्रदर्शित केले. शिस्तभंगाबाबतच्या कारवाईविषयी बोलताना ज्यांनी काँग्रेसच्या स्वीकृत धोरणांविरुद्ध असल्याचे जाहीरपणे सांगितले होते त्यांच्यावर शिस्तभंगाची कारवाई का केली गेली नाही असा त्यांनी सवाल केला. अध्यक्षीय निवडणुकीत कोणा एका व्यक्तीला मत द्या असे आपण कधीच सांगितले नव्हते फक्त प्राप्त परिस्थितीत योग्य विचार करून मत द्या एवढेच सांगितले होते; जगजीवनराम उभे असते तरी व्हिप् काढण्याचा प्रश्नच नव्हता, कारण कोणाला निवडून द्यावयाचे हा जनतेचा व मतदारांचा प्रश्न होता असेही त्या शेवटी म्हणाल्या. अशाच प्रकारचे विचार पंतप्रधानानी इतर सभात मांडले.

## वर्किंग कमेटीची सभा आणि सिंडिकेटची माघार :

काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सभेच्या वेळी एकादेवेळी दंगाधोपा होईल या भीतीने पोलिसांनी कडक बंदोबस्त ठेवला होता. काही विद्यार्थ्यांनी थोडा वेळ निदर्शने केली. २००० काँग्रेसजनांच्या सह्या असलेल्या अर्जात " कारण दाखवा " नोटीस परत घेतली जावी अशी मागणी केली होती तो अर्ज वर्किंग कमिटीला देण्यात आला. नोटीस परत न घेतल्यास काँग्रेस जनतेपासून दुरावेल अशी भीती अर्जात व्यक्त करण्यात आली होती, पंतप्रधानांचे काँग्रेसमध्ये राहणे फायदेशीर ठरेल असा उल्लेख होता.

वर्किंग कमिटीच्या सभेत अपेक्षित संघर्षाऐवजी तडजोडीच्या स्वरूपाचे दोन ठराव संमत करण्यात आले. सिंडिकेट गटाने पक्षातील फूट टाळली, पण त्या गटाला आपली प्रतिष्ठा गमवावी लागली. साहजिकच पंतप्रधानांना राजकीय विजय मिळाला असा अर्थ सर्वत्र लावण्यात आला. ज्या गोष्टींबाबत कारणे दाखविण्यास सांगितले गेले होते त्यांचा " निकालात निघालेल्या " असा उल्लेख करण्यात आला. त्यापाठीमागे " विसरा आणि क्षमा करा " अशी प्रवृत्ती असल्याचे दर्शविण्यात आले.

स्वतंत्र आणि जनसंघ या पक्षांशी अध्यक्षांनी निवडणूक–करार केला हा आरोप निराधार ठरविण्यात आला. " त्यावेळी उपलब्ध असलेल्या माहितीवरून ती चुकीची विधाने करण्यात आली होती, पण ती निराधार आहेत " असा मोघम ठराव संमत करण्यात आला. तडजोडीचा प्रमुख ठराव चव्हाण आणि सुब्रह्मण्यम् यांनी तयार केला होता. त्या ठरावात पंतप्रधान व अध्यक्ष यांनी सलोख्याने व तडजोडीने काम करावे असे सुचविण्यात आले होते. श्री. गिरींना काँग्रेसची काही मते फुटीरपणाने मिळाली होती तो प्रकार " दुःखद व दुर्दैवी " मानण्यात आला आणि महात्माजींचा आत्मपरीक्षणाचा मार्ग सर्वांनी स्वीकारावा अशी सूचनाही होती. पक्षात दुफळी झाल्यास त्याचे होणारे परिणाम मोजता येण्याजोगे नव्हते

असे नमूद करण्यात आले होते आणि दृष्टिकोन व ध्येये यांच्या संघर्षात सर्व बाजूंनी चुका झाल्याचे नमूद करण्यात आले होते.

तडजोडीचे ठराव झाले पण त्यामुळे संघर्ष संपला असे कोणालाच वाटले नाही; मात्र दोन्ही गटांना अधिक तयारी करण्यास व डावपेच लढविण्यास आणखी वेळ मिळाला अशी बहुतेकांची समजूत झाली. पंतप्रधानांच्या विरुद्ध जाऊन चव्हाण आपल्या गटाला येऊन मिळतील अशी ज्येष्ठ नेत्यांना खात्री नव्हती म्हणून तडजोड शक्य झाली होती. दुफळी झाल्यास सरकारच्या स्थैर्यावर दुष्परिणाम होतील व कदाचित खरोखरच कम्युनिस्टांवर अवलंबून राहण्याची वेळ येईल असे वाटत होते, म्हणून पंतप्रधानांच्या गटानेही विशेष खळखळ केली नाही. ( मात्र वर्किंग कमिटीत विरोधी गटाची सरशी झाल्यास तावडतोब योग्य अशी प्रति-उपाययोजना करता यावी म्हणून जवळच राहणाऱ्या एका खासदाराच्या घरी पंतप्रधानगटाचे अनेक सभासद जमले होते. )

या ठरावांनी अनेकांचे समाधान झाले नव्हते. मोरारजींना ते आवडले नव्हते व आपण मत नोंदविणार नाही असे सांगून ते आधीच निघून गेले होते. अनेकजणांनी श्री. गिरींना मत दिल्यामुळे इतक्यांविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करणे कठीण होते, म्हणून तो प्रश्न बाजूला टाकला गेला असे बऱ्याच सदस्यांचे मत होते. पक्ष व जनता यांच्यासमोर इंदिरा गांधींनी जे प्रश्न मांडले होते, त्यांच्याबाबत त्यांच्याशी दोन हात करणे ज्येष्ठ नेत्यांना शक्य नव्हते हे देखील तडजोडीचे एक कारण असावे असा अनेकांचा कयास होता. चव्हाणांना तडजोड घडवून आणण्याचे समाधान मिळाले पण ती एक फक्त ठिगळे लावण्याची क्रिया होती हे त्यांना माहीत होते. मात्र त्यामुळे त्यांना एका पेचप्रसंगातून आपली सोडवणूक करून घेता आली. कारण चाललेल्या सर्व प्रकारात चव्हाणांवर दोन्ही गटांकडून टीकाच होत होती – उघडपणे नसली तरी त्यांना काय करावयाचे आहे याबाबत प्रच्छन्न संशय व्यक्त होत होता.

तडजोडीचे ठराव संमत झाल्यावर पंतप्रधानगटाच्या खासदारांनी जल्लोष केला, तर पंतप्रधानांविरुद्ध कारवाई करावी असे सांगणाऱ्या खासदारांची बैठक रद्द झाली. लोकसभेतील बावीस अपक्ष सभासदांनी पंतप्रधानांना आपला पाठिंबा जाहीर केला.

ठरावानंतर दोन दिवसांनी वार्ताहरांशी बोलताना, शिस्तीबाबत आपण काहीच निर्णय न घेतल्याचे, पण पक्ष भंगू नये म्हणून तसे केल्याचे निजलिंगप्पांनी मान्य केले; पण बेशिस्त चालू देणार नाही अशी त्याला पुस्ती जोडली. इतर पक्षांशी करार केल्याचा जो आरोप आपल्यावर लादण्यात आला तो रेड्डींचा पराभव करण्याकरिता रचलेला एक कट होता, ती एक घातक प्रवृत्तीची घटना होती व त्यामुळे साहजिकच बेशिस्त वाढली, सदसद्विवेकबुद्धी आणि मतस्वातंत्र्या-सारख्या गोष्टी घडल्या व त्या सर्वांचा विचार करून वर्किंग कमिटीने निर्णय



अनुक्रमणिका

घेतला असे त्यांनी सांगितले. पण त्याबरोबरच देशात व्यक्तिपूजेची प्रवृत्ती वाढत असल्याचे व त्याच्या पाठोपाठ हुकूमशाही प्रवृत्तीकडे कल वाढत असल्याचे त्यांनी ध्वनित केले.

काँग्रेस पक्षातील डाव्या गटाचे तडजोडीच्या ठरावाने समाधान झाले नव्हते. पहिल्याच फेरीत मिळालेल्या थोडयाशा विजयाने त्यांचे समाधान झाले नव्हते. तो विजय निश्चित करण्यासाठी त्यांना काहीतरी पाहिजे होते. अध्यक्षांनी व्यक्त केलेले विचार काँग्रेस वर्किंग कमिटीच्या ठरावांशी सुसंगत नाहीत अशी टीका त्यांनी सुरू केली. अध्यक्षांनी पंतप्रधानांवर व त्यांच्या धोरणावर हल्ला केला असा प्रचार सुरू झाला. अर्जुन अरोरांनी याबाबतीत पुढाकार घेतला. तडजोडीच्या ठरावाला त्यांनी मान्यता दिली होती पण मागाहून पवित्रा बदलून परत ज्येष्ठ नेत्यांवर टीका करावयास सुरवात केली होती. घडलेल्या प्रसंगांनी आपण शहाणे झालो नाही व मूलभूत प्रश्न तसेच राहिले अशी चंद्रशेखरांची प्रतिक्रिया होती. घडत होते ते सर्व खेदजनक होते असे मोहन धारियांचे मत होते. जुनी मते असलेल्या नेत्यांनी बाजूला होऊन, नव्या दमाच्या तरुण पिढीला कार्यक्रम अंमलात आणण्याची संधी द्यावयास पाहिजे होती असे त्यांना वाटत होते. आक्रमक पवित्रा परत घेतला गेला होता.

या प्रचाराला उत्तर म्हणून की काय निजलिंगप्पांनी मोरारजीप्रश्न संपुष्टात आला नसल्याचे सांगून आपण पंतप्रधानांशी त्याबाबत चर्चा करणार आहोत असे जाहीर केले.

पंतप्रधानांनी ज्यांनी काँग्रेस सोडली होती त्यांना परत येण्याचे आवाहन केले. हे आवाहन समान विचारांच्या व्यक्तींना व पक्षांना उद्देशून होते. (चरणसिंग, हरेकृष्ण महाताब, अजय मुकर्जी इत्यादि नेते परत काँग्रेसमध्ये यावेत अशी पंतप्रधानांची इच्छा असावी असे मानले जात होते.)

पंतप्रधान लोकशाही शासनपद्धतीचा कणा असतो, त्याची एकदा निवड झाली की त्याच्या हाती पूर्ण अधिकार असावयास पाहिजेत, निर्णय घेण्याचे पूर्ण अधिकार मिळाले पाहिजेत, विधिमंडळाचा पाठिंबा नसल्यास त्याने राजिनामा दिला पाहिजे, इतर देशांची शासने व जनता यांच्याशी संबंध ठेवावे लागत असल्यामुळे त्याच्यावर निर्बंध असू नयेत अशी पंतप्रधानांच्या स्थानाविषयीची आपली कल्पना पंतप्रधानांनी एका भाषणात विशद केली. सिंडिकेटला उद्देशून बोलताना तेथे नेतृत्व फार थोडया व्यक्तींच्या हाती असते असा शेरा त्यांनी दिला. पक्षाचे अध्यक्ष व सांसदीय पक्षाचा नेता यांच्या परस्परसंबंधांबाबत बोलताना, वर्किंग कमिटीने त्यांच्या भूमिका परस्परांना साहाय्यक असे स्पष्ट केले असल्याचें सांगून, त्या दोघांची कार्यक्षेत्रे निराळी असली तरी त्या दोघांनी सहकार्याने काम केले पाहिजे असे मत त्यांनी व्यक्त केले.



अनुक्रमणिका



जगजीवनराम यांनी देशात समाजवादी रचना निर्माण होईपर्यंत सुरू असलेला संघर्ष थांबणार नाही असे सांगितले. भारताने दहा दिवसात जे मिळविले त्यासाठी इतर देशात हिंसाचार झाले, परंपरावादी भांडवलदारी समाजाचे आधुनिक समाजवादी समाजात रूपांतर करण्याचे कार्य तरुणांनी करावयाचे होते, माणसाची किंमत पैशावर न ठरता गुणवत्तेवर व चारित्र्यावर ठरली पाहिजे, जनतेने दिलेल्या प्रतिसादावरून सर्व लोक बँकांच्या राष्ट्रीयीकरणाच्या बाजूने होते असे स्पष्ट झाले होते, लढाई जिंकल्यासारखी दिसली तरी सर्व काही संपलेले नाही इत्यादि विचार त्यांनी व्यक्त केले. शेवटी मात्र त्यांनी, काँग्रेस-अध्यक्ष अजून तरवार पर्जात असले तरी आपणही सार फरोशच्या जमातीचे लढवय्ये आहोत असा एक टोला मारला.

नंदिहाळच्या सुट्टीवर गेलेल्या निजलिंगप्पांना, संघर्ष सुरू झाल्यावर त्यांनी राजिनामा द्यावयास हवा होता असे सुचविण्यात आले; त्यावर मी अध्यक्ष आहे तेच चांगले आहे असे त्यांनी उत्तर दिले व सत्तराव्या वर्षापर्यंत आपण काम करीत राहणार असा विश्वास दर्शविला. संजीव रेड्डी आतापर्यंत गप्प होते. त्यांनी आपले नाव प्रथम १७ मेला पंतप्रधानांकडून सुचविले गेले होते, पण युरोपच्या दौऱ्याहून परत आल्यावर आपल्या नावाविषयी वादविवाद झाल्याचे व आपल्याला सिंडिकेटचा उमेदवार मानले गेल्याचे ऐकून आपल्याला आश्चर्य वाटले अशी माहिती दिली. सभापती झाल्यापासून आपण सिंडिकेटच्या बैठकीला कधीच उपस्थित राहिलो नाही, पण आता तो भाग संपला असल्यामुळे आपली काहीही तक्रार नाही असे ते म्हणाले.

संघर्षाच्या पहिल्या फेरीत विजय मिळाल्यावर पंतप्रधानगटाने पंतप्रधानांची सत्ता सर्वश्रेष्ठ ठरविण्याचा प्रयत्न सुरू केला. विभूती मिश्र यांनी भारतात नेहरूंच्या वेळेपासूनच सांसदीय पक्षाचा नेता संघटनेच्या नेत्यापेक्षा श्रेष्ठ मानला गेल्याचे व तो मुद्दा परत चर्चिण्याचे काही कारण नसल्याचे सांगितले; हुकूमशाही राष्ट्रात–प्रामुख्याने साम्यवादी राष्ट्रात–पक्षनेता सर्वोच्च सत्ताधारी असतो, पण भारतात लोकशाही असल्यामुळे तो प्रश्न उद्‌भवत नाही असे त्यांनी दाखवून दिले; मंत्र्यांच्या निवडीतच नव्हे तर राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, अध्यक्ष यांच्या निवडीतही पंतप्रधानांचा शब्द निर्णायक मानला जावा असे कृपलानी, तंडन वगैरेंची उदाहरणे देऊन त्यांनी प्रतिपादन केले. या विषयावर निजलिंगप्पांनी संघटना गट आणि सांसदीय गट यांनी एकत्र राहून कार्य केले पाहिजे एवढेच सांगितले व कार्यक्षेत्रे काटेकोरपणाने वाटून घेता येणार नाहीत असे स्पष्ट सांगितले.

अ. भा. कां. कमिटीच्या पंचाहत्तर सभासदांनी ऑक्टोबरचे अ. भा. कां. कमिटीचे अधिवेशन सोइच्या दृष्टीने दिल्लीला भरवावे अशी अध्यक्षांना सूचना केली, पण एखादी गोष्ट सभासदास करावयास सांगण्याचे सामर्थ्य अध्यक्षाजवळ आता



अनुक्रमणिका

उरले नव्हते. शासकीय बाबतीत सर्वाधिकार आपल्याकडे असल्याचे पंतप्रधानांनी मागेच जाहीर केले होते. संघटनेबाबतही पदावर असणे यापेक्षा प्रत्यक्षात अध्यक्षांना जास्त अधिकार फक्त नावापुरतेच उरले होते.

मोरारजींच्या अधिकारग्रहणाचा प्रश्न वरचेवर विचारला जात होता, चर्चिला जात होता. त्याला उत्तर म्हणून "प्राप्त परिस्थितीत आपण मंत्रिमंडळात जाण्याचा प्रश्न उपस्थित होत नाही—उपमुख्यप्रधान म्हणून राजिनामा दिला तो मंत्रिमंडळात कसेतरी जाण्याठी नव्हे" असे जाहीरीत्या त्यांनी घोषित केले. पंतप्रधानांना ते कम्युनिस्ट समजत नव्हते, पण कम्युनिस्ट परिस्थितीचा फायदा घेतील असे त्यांना वाटत होते. पंतप्रधानांना आपली चूक लौकर समजावी आणि बदला घेण्याचा विचार न ठेवता त्यांनी सर्व परिस्थिती समजावून घ्यावी एवढीच त्यांची इच्छा होती. घडलेल्या घटना देशाला, लोकशाहीला व काँग्रेसला विघातक ठरतील व फक्त कम्युनिस्टांना त्यांचा फायदा होईल अशी त्यांना भीती वाटत होती, पण जिवात जीव असेपर्यंत कम्युनिस्टांशी मुकाबला करण्याचा त्यांचा विचार होता." आमच्या संस्कृतीच्या आणि जीवनमार्गाच्या विरोधी विचारसरणी माझ्या मृत शरीरावरूनच आत येऊ शकेल, असे निकराचे उद्गार त्यांनी एकदा काढले होते. त्यांनी पंतप्रधानांना पाठिंबा देण्यासाठी आलेली माणसे पाहिली होती; त्यांच्यामध्ये बहुतेक टांगेवाले, झाडूवाले व शाळकरी मुले होती; त्यांना राष्ट्रीयीकरण म्हणजे काय ते कळत होते की नाही याबाबत शंका होती, त्यांची संख्याही सुमारे २५० ते ३०० असावी असा त्यांचा अंदाज होता.

काँग्रेसच्या उमेदवाराचा पराभव म्हणजे पंतप्रधानांचा विजय भासविणे हा त्यांना विसंगतीचा एक भाग वाटत होता. सद्सद्विवेकबुद्धीची मोहीम हा पक्षविघटनाचा एक तरल मार्ग होता. पंतप्रधानांनी त्यांच्याविरुद्ध कारवाई केली असती तर त्याबाबत त्यांचे काही म्हणणे नव्हते; पण आपल्या बेशिस्त वर्तनाने त्यांनी पक्ष आणि राष्ट्र यांना अगदीच कमी लेखले होते; त्यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी काँग्रेस–सदस्यांना काँग्रेसविरुद्ध मत द्यावयास लावले होते. जगजीवनराम आणि फकरुद्दिन यांनी जातीय व धार्मिक भेदभाव फैलाविले होते याचे त्यांना दुःख होते. पंचायतसमितीच्या निवडणुकात पक्षाच्या विरुद्ध वागल्यास सदस्यांना शिक्षा करण्यात आल्या होत्या, मग पुढाऱ्यांनी चुका केल्यास त्यांना का मोकळे सोडावे हे त्यांना कळत नव्हते.

**पंतप्रधानाकडून प्रतिहल्ला :**

आपण व्यक्तिपूजा वाढविण्याचा प्रयत्न करीत आहोत या आपल्यावरील टीकेला उत्तर देताना आपण फक्त काँग्रेसचे अनुयायी आहोत व त्या पक्षाचे



अनुक्रमणिका

थोडेफार कार्य करीत आहोत असे पंतप्रधानांनी सांगितले. नव्या धोरणामुळे जनतेमध्ये उत्साह निर्माण झाला म्हणून घाबऱ्याघुबऱ्या झालेल्या पक्षांचा अशा टीकेने जनतेची मने वळविण्याचा प्रयत्न चालू होता असे त्यांना वाटत होते. नव्या उत्साहामुळे अनेक राज्यात ढासळलेली काँग्रेस सावरत होती. काही ना काही कारणाने काँग्रेस सोडून गेलेल्या सर्वांनी काँग्रेसमध्ये परत यावे असे त्यांना वाटत होते व ते त्यांचे आवाहन समाजवादासाठी काँग्रेस बद्धपरिकर आहे असे ज्यांना वाटेल अशा व्यक्तींसाठी व पक्षांसाठी होते.

महात्माजींनी संघटनेचे रूपांतर स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या संघटनेत केले त्यावेळी प्रथम पक्षाची शिस्त मोडली, असे सांगून यावेळी काँग्रेसने तशाच प्रकारचा दृष्टिकोन स्वीकारला होता असे त्या म्हणाल्या. विषमता नाहीशी करण्याकरता शिक्षणाचे राष्ट्रीयीकरण, शहरी मालमत्तेवर मर्यादा, पगारावर मर्यादा इत्यादि उपाय सुचविण्यात आल्याचे त्यांनी सांगितले. राष्ट्रीयीकरणापूर्वी अनेकांचा पैसा श्रीमंत अधिक श्रीमंत होण्यासाठी वापरीत असत व ते अतिशय अन्यायकारक असे. आता जनतेचा पैसा जास्तीत जास्त लोकांचे भले करण्या-करिता वापरला जाईल. त्या सर्व उपायांमुळे आर्थिक स्थैर्य वाढेल, गरीब आणि श्रीमंत यांच्यामधील अंतर कमी होईल आणि देशातील तंग वातावरण नाहीसे होईल अशा प्रकारचा आशावाद त्यांनी प्रकट केला.

कारखानदार सरकारी मदतीमुळे श्रीमंत झाले, पण राष्ट्रीय गोष्टींबाबत अगदी स्वार्थी वृत्ती स्वीकारून सामान्यांच्या कल्याणापेक्षा ते जास्तीत जास्त नफा मिळविण्याच्या मागे लागले अशी टीका त्यांनी केली. सरकारचा त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्याचा विचार नव्हता, पण थोडेसे विशेषाधिकारी आणि बहुसंख्य दलित यांच्यात विरोधाचा प्रश्न आल्यास सरकार दलितांच्या बाजूने उभे राहणार होते. गरिबांचा उद्धार होईपर्यंत श्रीमंतांचीच फक्त भरभराट होणार नव्हती.

टीकाकारांनी हुकूमशहा म्हणून त्यांच्यावर केलेल्या टीकेमुळे लोक फसणार नव्हते. आपण नाहीसे झालो तरी कल्पना अमर राहतील असा त्यांना विश्वास होता. त्या कोणाच्याच सल्ल्याने वागत नव्हत्या, तर सर्व निर्णय आपले आपणच घेत होत्या असे त्यांनी स्पष्टपणे सांगितले.

गेल्या काही वर्षात काँग्रेस जनतेपासून दूर गेली होती; नेत्यांचे वर्चस्व हा पक्षाचा अवगुण ठरला होता; खोटे सभासद हा दुसरा एक दोष होता. हे दोन्ही दोष दूर करणे त्यांच्या दृष्टीने आवश्यक होते. पुरोगामी लोकांसमोर फार मोठा लढा आहे, जनतेने त्यासाठी तयार राहावे; काँग्रेसमध्ये, इतर पक्षात, सरकारात सर्वत्र भांडवलदार घुसलेले आहेत; राष्ट्रीयीकरणामुळे स्तिमित होऊन त्यांनी त्याला मान्यता दिली असली तरी प्रतिहल्ला करण्याची ते तयारी करीत आहेत असा इशारा देऊन, आपण जनतेला मोठमोठी वचने दिली असली तरी ती



अनुक्रमणिका



आपण पुरी करू शकणार नाही अशा प्रकारची कुजबूज आपल्याविषयी सुरू आहे; कम्युनिस्ट म्हणून काही उपयोग झाला नाही म्हणून असा प्रचार सुरू आहे असे आपले मत झाल्याचे त्यांनी सांगितले. आपण झटपट वैभवाच्या गप्पा मारल्या नसून, सर्व जनतेला त्याग आणि कष्ट यासाठी तयार राहून दीर्घकाळ चालणाऱ्या या खडतर लढ्यात आपल्याबरोबर मार्गक्रमण करावयाचे आवाहन केले; देशातील विकासामुळे श्रीमंत होऊन आपली साम्राज्ये उभविलेल्या प्रतिगाम्यांनी आपल्यावर हल्ला चढविण्याची तयारी केल्याचे सांगितले; ही सर्व आव्हाने स्वीकारण्याची आपली तयारी असून ती शक्ती आपल्याला जनतेकडून मिळाली; जनशक्तीपेक्षा दुसरी कोणतीही मोठी शक्ती असू शकत नाही व त्या शक्तीच्या जोरावर राष्ट्राच्या पुनर्रचनेला सुरवात झाली इत्यादि गोष्टी त्यांनी स्पष्ट केल्या.

याउलट काँग्रेसमधील बेशिस्तीने केंद्रसरकार कोसळेल अशी भीती मोरारजींना वाटत होती. संघर्षामुळे ध्रुवीकरणाऐवजी विभाजन होईल असे त्यांचे ठाम मत होते. पक्षातील शिस्तीला त्यांची गरज होती असे त्यांना वाटत होते म्हणून ते वर्किंग कमिटीतून राजिनामा देणार नव्हते. निव्वळ अधिकार मिळावा म्हणून ते एकाद्या गटात गेले नव्हते; पंतप्रधान होण्यासाठी ते जीव टाकीत नव्हते, पण पक्ष टिकण्यासाठी ते सर्व काही करीत होते असा त्यांचा दावा होता. पंतप्रधानांच्या अधिकारांबाबतचा वाद फुकट चालला होता; वर्किंग कमिटी अध्यक्ष व पंतप्रधान एकमेकांना पूरक मानीत होती; पक्षाचे धोरण व कार्यक्रम अंमलात आणणे हे पंतप्रधानांचे कर्तव्य असते, पण ती कोणत्या प्रमाणात व कोणत्या पद्धतीने अंमलात आणावयाची ते पक्ष त्यांना सांगू शकतो असे त्यांचे मत होते. त्यांनी टांगेवाले वगैरेंचा उल्लेख केला होता तो उपहासाने नव्हता, ते त्यांना आपल्या बरोबरीचे नागरिक मानीत होते; त्यांना फक्त एवढेच दाखवावयाचे होते की प्रंतप्रधान ज्यांना राष्ट्रीयीकरणाबाबत काही कळत नव्हते त्यांच्यासमोर त्या विषयावर बोलत होत्या.

सप्टेंबर आठला पंतप्रधान आणि अध्यक्ष यांची दुसरी बैठक झाली. अध्यक्षांनी मोरारजींचा प्रश्न उपस्थित केला, पण पंतप्रधानांनी तो चर्चेत घेतला नाही व तो तसाच राहिला. मंत्री नेमणे वगैरे निर्णयांबाबत आपण संघटनेचे कोणतेही निर्बंध पाळणार नाही असे इंदिरा गांधींनी स्पष्टपणे सांगितले होते. होत्या त्या परिस्थितीत मोरारजी मंत्रिमंडळात जावयास तयार नव्हते म्हणून निजलिंगप्पांनी त्याबाबत अधिक आग्रह धरला नाही.

या भेटीच्या आधी पंतप्रधानांनी आपल्या सहकाऱ्यांना आपण देसाईंच्या प्रश्नावर चर्चा न करण्याचे आश्वासन दिले होते. गैरसमज दूर करून झाल्या गोष्टी विसरून जाव्या असे अध्यक्षांना वाटत होते. काँग्रेसचे अध्यक्ष कोणत्याही एका गटाचे नसावेत असे वाटल्यावरून म्हैसूरच्या काही खासदारांनी गैरसमज दूर

घ्यावेत अशी त्यांना विनंती केली होती व म्हणून त्यांनी कोणत्याच प्रश्नाचा आग्रह धरला नव्हता.

पंतप्रधानांच्या सभा व भाषणे सुरूच होती. लोकशाही आणि समाजवाद या गोष्टी गरिबांसाठीच स्वीकारल्या, जनतेने काय करावे हे सांगण्यासाठी आपण सर्व काही करीत आहोत असे त्या पुन्हा पुन्हा सांगत होत्या; तर काँग्रेसचे अध्यक्ष कम्युनिस्टांच्या धोक्यापासून आपण देशाला वाचवावयाचा प्रयत्न करीत आहोत; राष्ट्रीयीकरण हे समाजवादावरच्या मार्गावरचे फक्त एक पाऊल होते; त्यांचा कल मोठ्या भांडवलदारीकडे नसून छोट्या उद्योगांकडे होता; घटनेतील मूलभूत हक्कांसाठी रक्ताचा शेवटचा थेंब असेपर्यंत ते लढणार होते असे सांगत होते. शिस्त मोडणाऱ्यांना शिक्षा व्हावयास हवी हा दृष्टिकोन फक्त मोरारजींनी कायम ठेवला होता. त्यांनी नेहमी काँग्रेसने सांगितले त्याप्रमाणे काम केले होते; काँग्रेस बलिष्ठ होण्यासाठी शिस्त अत्यावश्यक होती; शिस्तभंग केलेल्यांनी चुका मान्य करणे हा एकच पर्याय योग्य होता; पक्षाच्या संस्था बाजूला ठेवून पंतप्रधानांनी शिस्त कशी मोडली ते ते स्पष्ट करून दाखवीत होते; घडलेल्या घटनांमुळे कम्युनिस्टांना समाधान वाटेल असे त्यांचे मत होते. " कम्युनिस्ट आपल्या पक्षात अतिशय कडक शिस्त पाळतात, पण त्यांना काँग्रेसमध्ये बेशिस्त हवी आहे, कारण त्यामुळे त्याना देश ताब्यात घेणे सोपे जाणार आहे, " अशी त्यांची प्रतिक्रिया होती. पंतप्रधान जुनाट लोकांना काढून टाकून महात्माजींनी केली त्याप्रमाणे काँग्रेस स्वच्छ करणार होत्या या बढाईचा त्यांनी उपहास केला व महात्माजीं-बरोबर कोणाचीच तुलना होऊ शकणार नाही असे सांगून, ज्यांना चळवळीत भाग घ्यावयाचा नव्हता तेच बाहेर गेले अशी त्यांनी माहिती दिली.

मोरारजींच्या या भाषणाच्या वेळी पंतप्रधान बिहारमध्ये होत्या. त्यांना ते भाषण दाखविल्यावर " आमची पुरोगामी आणि विवेकी भूमिका बरोबर होती असे जनतेनेच सिद्ध केले आहे; आम्ही आमच्या चुकांची कबुली द्यावी असे ज्यांना वाटते त्यांनाच आपल्या चुकांची कबुली जनतेला द्यावी लागेल ", असे उद्गार त्यांनी काढले.

पक्षातील स्वतःचे स्थान बळकट करण्यासाठी त्यांनी जातीयतेचा उपयोग मुळीच केला नव्हता. समाजवादाच्या मार्गावर एकाकी जाण्याची त्यांची तयारी होती. लोकशाही, मानवी स्वातंत्र्य, धर्मनिरपेक्षता आणि समाजवाद यावर विश्वास असणाऱ्या, समान विचार असणाऱ्या सर्वांचे सहकार्य त्यांना हवे होते. " माझे सर्व व्यक्तिमत्व महात्माजी आणि नेहरू यांनी वाढविलेल्या आणि जोपासलेल्या काँग्रेसने भरून गेले आहे. माझी श्रद्धा आणि निष्ठा लाभेल असा दुसरा कोणताही पक्ष मला दिसत नाही. मात्र कोणत्याही पक्षावर अंधश्रद्धा ठेवण्यापेक्षा त्या दोघांनी प्रतिपादलेली लोकशाही आणि समाजवाद ही तत्त्वे मला जास्त प्रिय आहेत " असे त्यांनी स्पष्ट केले.



अनुक्रमणिका



लोकशाही समाजवाद पाहिजे असलेल्या गरीब जनतेशी काँग्रेसचे भवितव्य निगडीत असल्यामुळे, त्या काँग्रेसशी एकजीव होऊन त्यांच्यावर आलेल्या ऐतिहासिक जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी कोणताही त्याग करण्यास त्या तयार होत्या.

त्यानंतर अत्यंत भारावलेल्या आवाजात त्या म्हणाल्या, " संघटनेतील नेत्यांची जी श्रेणी होती, त्यापैकी वर्चस्व असलेल्या काही थोडयांच्या मतानुसार चालल्यासच मी पंतप्रधान राहीन असे मला सांगणे हा माझा अवमान होता. लोकशाही समाजवादाकडे जाण्याच्या मार्गावर गती वाढविणे यापेक्षा पंतप्रधानाचे पद फारच कमी महत्त्वाचे असे मी मानते." त्या कम्युनिस्ट होत्या असा प्रचार चालला होता त्याविरुद्ध त्यांनी सावधगिरीचा इशारा दिला. त्यांनी स्वीकारलेल्या धोरणाला डाव्या पक्षांनी वा कम्युनिष्टांनी पाठिंबा दिला तर त्यात काँग्रेसजनांनी घाबरण्यासारखे काहीच नव्हते. इतर पक्षांच्या सूचना व टीका याकडे लक्ष देणे आवश्यक होते. त्यांचे परराष्ट्रीय धोरण सोव्हिएट गटाला अनुलक्षून होते या टीकेत काही अर्थ नव्हता. अलिप्ततावाद हा भारताच्या धोरणाचा पाया होता. राष्ट्रीय हितसंबंधांचा व प्रत्येक घटनेच्या गुणवत्तेचा विचार करून धोरण ठरविले जात होते.

कलकत्याच्या एका सभेत बोलताना त्यांनी मॅकार्थीवाद भारतात डोके वर काढीत आहे असे सांगितले, आपण आर्थिक बाबतीत मध्यममार्ग स्वीकारला असून आपले धोरण मध्यममार्गाकडून थोडेसे डावीकडे झुकते राहील असे उद्योगपतींना सांगितले, राष्ट्रीयीकरणाचे क्षेत्र वाढविण्याचा विचार नसल्याचे जाहीर केले; जगावयाचे असेल तर पक्षाने जनतेबरोबर राहावयास पाहिजे असेही सांगितले.

याच सुमारास जगजीवनरामांनी दहा वर्षे प्राप्तीकर भरला नाही हा गौप्यस्फोट मोरारजींनी केला. त्याबाबत " मला आता काही सांगावयाचे नाही, मला माझ्या कायद्याच्या सल्लागारांना आधी विचारले पाहिजे, " अशी प्रतिक्रिया जगजीवनरामांनी व्यक्त केली. दुसऱ्या एका ठिकाणी बोलताना, " मी मोरारजींच्या व्यक्तिमत्वाविषयी चर्चा करणार नाही, व्यक्तीविषयक चर्चा करण्याची खालची पातळी मला गाठावयाची नाही " असे ते म्हणाले. " इतर सर्वांना क्षमा केली जात आहे, आपण मात्र विसरले गेले आहोत, " या मोरारजींच्या वक्तव्यविषयी " ते अगदी केविलवाणे वाटते " एवढेच उद्‌गार त्यांनी काढले.

राष्ट्रीय सरकार स्थापन होऊन सिंडिकेटवादी मंत्र्यांना घालवून देण्यासाठी मंत्रिमंडळाची पुनर्घटना होणार अशी वावडी उठली होती तिचा पंतप्रधानांनी इन्कार केला. काँग्रेसशासनच त्यांच्या दृष्टीने राष्ट्रीय शासन होते. पक्षातील लढयाचे नवे पर्व केव्हा सुरू होणार असा प्रश्न विचारला असता तसा लढा



अनुक्रमणिका

कॉंग्रेसमध्ये नाही असे त्यांनी उत्तर दिले. देश एका विशिष्ट मार्गाने जात असता, त्या मार्गावर संघर्ष झाल्यास लढा द्यावा लागेल असे त्या म्हणाल्या. कल्याणकारी समाजवादी हुकूमशहाची देशाला जरुरी होती तेव्हा ते स्थान त्या घेऊ शकतील का असा प्रश्न त्यांना विचारण्यात आला, तेव्हा आपल्याला हुकूमशहा बनण्याची मुळीच इच्छा नाही असे त्यांनी उत्तर दिले.

निजलिंगप्पांनी पंतप्रधानांच्या भाषणातील विधानांना उत्तर प्रदेशातील रामपूर येथील भाषणात आक्षेप घेतला. ज्यांनी पंतप्रधानांच्या धोरणाला विरोध केला त्यांना पंतप्रधानांनी प्रतिगामी म्हटले होते, त्यावर, " आपणच फक्त पुरोगामी व इतर सर्व मागासलेले व प्रतिगामी म्हणण्याची हल्ली एक फॅशन निघाली आहे, जेव्हा वेळ येईल तेव्हा जनताच कोण पुरोगामी व कोण प्रतिगामी ते ठरवील " अशी निजलिंगप्पांनीं टीका केली.

यापुढचे पहिले पाऊल पंतप्रधानांनी टाकले. आपल्या विरोधकांकडून कॉंग्रेसमधील ऐक्य भंग होण्याची शक्यता पंतप्रधानांनी दिल्लीत वार्ताहरांशी बोलताना सोळा सप्टेंबरला सूचित केली. तेथे बोलताना, इतर सर्वजण २५ ऑगस्टच्या ठरावाचा वाटेल तो अर्थ लावून पक्षाच्या कार्यकर्त्यांनी एकत्र यावे असे म्हणत होते; पण त्या स्वतः कोणाही विरुद्ध बोलत नव्हत्या; कॉंग्रेसची कोणत्याही टोकाला जावयाची तयारी नव्हती; ती मध्यममार्ग सोडणार नव्हती त्या कोणताही नवा कार्यक्रम हाती घेत नव्हत्या; फक्त आश्वासित कार्यक्रम अंमलबजावणीत आणीत होत्या; कॉंग्रेस कम्युनिस्ट बनणार नव्हती; समाजवाद हे ध्येय नव्हते, तर ध्येयसिद्धीचें एक साधन होते; राष्ट्रीयीकरणाने काही थोड्या लोकांशिवाय इतरांना फारसा फायदा होणार नाही हे आपण पूर्वीच स्पष्ट केले होते; कारण ठेवीदारांचा पैसा उधळावयाचा नव्हता इत्यादि गोष्टी त्यांनी स्पष्ट केल्या व अर्थखाते सोडणार नसल्याचे व विशिष्ट साध्यांसाठी आपण ते आपल्या-कडे ठेवल्याचे त्यांनी सांगितले. आणखीही अनेक प्रश्नांची त्यांनी उत्तरे दिली. शासन आणि संघटना यातील संबंधांचा प्रश्न पंडित नेहरूंच्या काळातच निकालात निघाला होता; त्यांना अध्यक्षपद स्वतःकडे घ्यावयाचे नव्हते; कोणत्याही पक्षा-बाबत त्यांना जिव्हाळा नव्हता किंवा द्वेष नव्हता. पण काही मते त्यांना घृणास्पद वाटत होती व त्याविरुद्ध लढा देणे आवश्यक आहे असे त्यांना वाटत होते.

**चव्हाणांचे आवाहन :**

१८ सप्टेंबरला पंतप्रधानांनी घोषित केलेला समाजवाद अंमलात आणण्या-साठी सर्वांनी मदत करावी असे चव्हाणांनी आवाहन केले. दोन महिन्यापूर्वीची कॉंग्रेस आता राहिली नाही; कोण बरोबर कोण चूक याचा विचार आता नको; पंतप्रधान आपल्या नेत्या मानून सर्वांनी शिपाईगड्याप्रमाणे त्यांच्याशी सहकार्य



अनुक्रमणिका



करून समाजवादासाठी झटावे असे त्यांनी कळकळीने सांगितले. दोन महिन्यात झालेल्या घडामोडींचा उगम बंगलोरला झाला ही समजूत चुकीची होती; बंगलोरला पंतप्रधानांचे पत्र वाचले गेल्यावर, त्यावर एकमताने काही निर्णय घेण्यात आले एवढेच असे त्यांनी स्पष्ट केले. आपल्या मतानुसार आपण रेड्डींना पाठींबा दिला; कारण रेड्डी काँग्रेसचे एक सेवक होते; ते सभापती होते; कोणी बाहेरचे नव्हते व निवडून आले असते तर ते भारताचे घटनात्मक प्रमुख झाले असते; काँग्रेसचा उमेदवार अमुकच असावा असा त्यांचा आग्रह नव्हता; आपण कुंपणावर बसलो आहोत अशी टीका आपल्यावर झाल्याचे सांगून, काँग्रेस एकसंध राहिल्यासच समाजवादी कार्यक्रम अंमलात येऊ शकेल अशी आपली कल्पना असल्यामुळे आपण पक्षात एकी राखण्याचा प्रयत्न केला; पण ते कुंपणावर बसणें नव्हते–एक विधायक दृष्टिकोन होता असे ते म्हणाले.

२१ सप्टेंबरला पुण्याला बोलताना, काँग्रेसचा आर्थिक कार्यक्रम अंमलात आणणे हा आपला प्रमुख उद्देश असून त्यासाठी प्रत्येक इंच लढविण्याची आपली तयारी असल्याचे ते म्हणाले. अध्यक्षीय निवडणुकीमुळे नव्हे, तर आर्थिक कार्यक्रम अंमलात आणण्यातील कुचराईमुळे व चालढकलीमुळे काँग्रेसमधील फुटीचा संभव निर्माण झाला असे त्याचे त्यांनी निदान केले. " हा पेचप्रसंग जनतेच्या अतृप्त आकांक्षांमुळे निर्माण झाला. पण आता काँग्रेस नव्या स्वरूपात पुढे आली आहे; अध्यक्षीय निवडणुकीमुळे तिला एक नवे वळण लागले आहे, " असे ते म्हणाले. राष्ट्रीयीकरण करून पंतप्रधानांनी आर्थिक व्यवस्थेला एक नवी दिशा दिल्याचे सांगून, पेचप्रसंगाच्या वेळी आपण आपली मते स्पष्ट न केल्याने काँग्रेससदस्य–विशेषतः महाराष्ट्रातील–गोंधळले अशी आपल्यावर टीका झाल्याचा त्यांनी उल्लेख केला. " बंगलोरच्या पेचप्रसंगाचा आपल्यावर परिणाम झाला; होणाऱ्या वादळाचा अंदाज घेऊन आपण काहीच न बोलण्याचा निर्णय घेतला; आपण बोलल्यास कदाचित जास्त गोंधळ होईल असे वाटल्यामुळे आपण काही बोललोच नाही– तशात स्वभावतःच मी कमी बोलतो, "–अशी आपली भूमिका त्यांनी स्पष्ट केली. काँग्रेसच्या आर्थिक कार्यक्रमावर ज्यांचा विश्वास नाही, त्यांना संघटनेत जागा नाही; त्यांनी निवृत्त व्हावे हे बरे असाही शेवटी त्यांनी सल्ला दिला.

इकडे देशात निरनिराळ्या कारणांनी असंतोष वाढत होता, तर काही ठिकाणी त्याचा हिंसाचारात उद्रेक होत होता. रावातमुळे निर्माण झालेल्या असंतोषातून अहमदाबादची जातीय दंगल उद्भवली. (तेथे शांतता प्रस्थापित होईपर्यंत देशाचा आणि गुजरातचा सेवक या नात्याने मोरारजींनी आमरण उपोषणास सुरुवात केली.) पंतप्रधानांच्या इंफालच्या सभेत मणिपूरला राज्याचा दर्जा द्यावा म्हणून झालेल्या निदर्शनात दगडफेक झाली, गोळीबार झाला व त्यात तीन माणसे दगावली. पंतप्रधानांनी तशा प्रकारच्या वर्तनामुळे कोणतेही प्रश्न सुटत नाहीत

असे निदर्शकांना बजाविले; तरी पंतप्रधानांच्या सभेच्या वेळीही हे प्रकार होऊ शकतात ही गोष्ट कायमच राहिली.

## सिंडिकेट गटाची उचल :

रेल्वेमंत्री रामसुभगसिंग उघडपणे सिंडिकेट गटाच्या बाजूने बोलू लागले. त्यांनी अध्यक्षांच्या शिस्तीबाबतच्या भूमिकेला पाठिंबा दिला. पक्षशिस्त मोडली गेली व ते प्रकरण तसेच दडपले गेले अशी भावना देशभर पसरल्याचे, पण अशा नाजूक बाबी सावधगिरीने हाताळल्या पाहिजेत असे पाटील यांनी जाहीर केले. जातीयतेचा उपयोग करून व जनतेच्या डोळ्यात धूळ फेकून काँग्रेस उमेदवाराचा पराभव करण्यात आला व जे जिंकले ते खोटया ढोंगीपणाने जिंकले असेही विधान त्यांनी केले.

मोरारजी देसाई व पंतप्रधान यांच्यात समझौता घडवून आणण्याचा प्रयत्न करण्याची आपली इच्छा आहे, पण आपल्याला ते जमेल का नाही ते सांगता येत नाही; बेशिस्तीचा प्रश्न फक्त पक्षाचा नसून, वैयक्तिक बेशिस्तीचाही प्रश्न होनाच असे त्यांनी आपले मत असल्याचे सांगितले व विचारातील फरक आणि वैयक्तिक आवडीनिवडी ही बेशिस्तीची कारणे म्हणून दाखविली.

## सुब्रह्मण्यम् यांचा राजिनामा :

तामिळनाडू प्रदेश काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष सुब्रह्मण्यम् यांनी आपल्या पदाचा आकस्मिक राजिनामा देऊन सर्वांना आश्चर्याचा धक्का दिला. २७ सप्टेंबरला वार्ताहरपरिषदेत पंतप्रधान व स्वतः आपण या दोघांविरुद्ध द्वेषभावना फैलावण्याबाबत त्यांनी कामराजांवर अत्यंत कडक शद्वात टीका केली. कामराजांना पाठिंबा देणाऱ्या गटाकडून आलेल्या तीव्र दडपणामुळे आपल्याला राजिनामा देणे भाग पडले असा त्यांचा एकदर सूर होता. राष्ट्रपती–निवडणुकीच्या वेळच्या कामराजांच्या एकंदर वागण्यामुळे सुब्रह्मण्यम् यांना उद्वेग आला. पंतप्रधानांच्या चुका दुरुस्त केल्याच पाहिजेत अशी दृढ भूमिका कामराजांनी लावून धरली. रेड्डी राष्ट्रपती म्हणून निवडून येतील अशी कामराजांना खात्री होती व तसे झाल्यावर पंतप्रधानांना स्थानभ्रष्ट करण्याचा त्यांचा निश्चित असा इरादा होता. (संजीव रेड्डीच उमेदवार का यावर माहीतगार गोटातील सुब्रह्मण्यम् यांच्यासारख्या व्यक्तीने स्पष्टपणे आणि उघडपणे बोलण्याची ही पहिलीच वेळ होती.) पण रेड्डी निवडून आले नाहीत आणि सिंडिकेटचे मनसुबे फसले. कामराजांनादेखील रेड्डी योग्य आहेत याबाबत खात्री नव्हती; पण अगदी निकटचा वैयक्तिक स्नेही म्हणून, राष्ट्रहित आणि पक्षहित बाजूला ठेवून कामराजांनी त्यांना पाठिंबा दिला होता. एवढा गौप्यस्फोट केल्यावर श्री.



अनुक्रमणिका



सुब्रह्मण्यम् यांनी कामराज व चव्हाण यांची तुलना करून, चव्हाणांना पंतप्रधानपद देऊ केले असताही त्यांनी ते नाकारले; आपण फक्त रेड्डींना पाठिंबा देऊ पण सिंडिकेटच्या इतर बाबतीत आपण काही करणार नाही असे सांगितले त्याचा उल्लेख केला. (चव्हाणांची ही प्रशस्ती तितकीशी मनापासून नव्हती अशी त्याबाबत प्रतिक्रिया काही ठिकाणी झाली होती.) सुब्रह्मण्यम् यांनी त्यानंतर असे सांगितले की, कामराजांच्या मताप्रमाणे गोष्टी झाल्या असत्या, तर कदाचित त्या वेळेपर्यंत काँग्रेसपक्षच राहिला नसता व देशावर संकट कोसळले असते; कारण राष्ट्रपती–निवडणुकीपूर्वी कामराज यांनी वर्किंग कमिटीची सभाच होऊ दिली नाही व पंतप्रधानांबरोबर असलेले मतभेद नाहीसे करू देण्यास कोणाला संधीच दिली नाही. कामराजांच्या पाठिराख्यांना तामिळनाडूत सामुहिक नेतृत्व पाहिजे होते. सुब्रह्मण्यम् यांनाही तसे झाले तर बरे असे वाटत होते; पण चव्हाण यांनी निःसंदिग्ध शब्दात सिंडिकेटचा संबंध सोडल्याचे जाहीर करीपर्यंत, पंत-प्रधानांविषयी आपले पूर्वग्रह व आपली वैमनस्याची भावना सोडीपर्यंत व चव्हाणांनी केले त्याप्रमाणे पंतप्रधानांना विनाअट पूर्ण पाठिंबा जाहीर करीपर्यंत तसे शक्य होणार नाही असे त्यांना वाटत होते. सुब्रह्मण्यम् यांनी आपला राजिनामा देण्याचा निर्धार व निर्णय पंतप्रधानांना कळविला होता. प्रलोभन असताना आपली वैयक्तिक प्रतिष्ठा, आपली महत्त्वाकांक्षा बाजूला सारून, आपले हितसंबंध विसरून राष्ट्रहित पाहिले याबाबत सुब्रह्मण्यम् यांनी चव्हाणांचे कौतुक केले. आपण आणि चव्हाण या दोघांनी समझौता करण्यासाठी खूप प्रयत्न केल्याचे त्यांनी सांगितले. कामराज आणि संजीव रेड्डी यांनी पंतप्रधानांना भेटावे अशी सूचना आपण केली होती पण ती कामराजांनी उडवून लावल्याचे त्यांनी सांगितले. निवडणुकीचा निकाल लागण्यापूर्वी समझौता झाला पाहिजे असे आपले व चव्हाण यांचे मत होते व त्याप्रमाणे झाले नाही तरी २५ ऑगस्टचा एकीचा ठराव करण्यात आपल्याला यश आले पण कामराजांना बळी पाहिजे होता म्हणून त्यांनी आपल्याला राजिनामा देण्यास भाग पाडले होते.

बहुतेक उच्च नेत्यांनी या राजिनाम्याचे दुःखी व दुर्दैवी असे वर्णन केले असले तरी प्रत्यक्षात कितीना तसे खरोखर वाटले हा प्रश्न निराळा. दोन्ही गटांच्या डावपेचांचा एक भाग म्हणून हा राजिनामा होता व तो एका विशिष्ट वेळी देण्यात आला होता. मात्र या राजिनाम्याने भिन्न प्रकारच्या प्रतिक्रिया झाल्या. वर्किंग कमिटीच्या अनेक सभासदांनी ऐक्याचा ठराव झाला असतानाही घडणाऱ्या या घटनांबाबत चिंता व्यक्त केली. श्रेष्ठ नेत्यांच्या वर्तनाची खुली चर्चा सामान्य सभासदाना करता यावी म्हणून अ. भा. काँ. कमिटीची लौकरात लौकर बैठक घ्यावी असे बऱ्याच सभासदाना वाटू लागले. पंतप्रधानाना स्थानभ्रष्ट करून त्यांच्या जागी श्री. चव्हाणांना आणण्याचा (प्रत्यक्षात प्रथम मोरारजी व

१९७२ नंतर चव्हाण अशी योजना होती ) सिंडिकेट गटाचा विचार होता ही गोष्ट बंगलोरनंतर वर्किंग कमिटीच्या एका सभासदाने–कामराजांचा एकावेळी उजवा हात मानल्या गेलेल्या सभासदाने–उघडपणे प्रथमच जाहीर केली होती. चव्हाणांनी पंतप्रधान होण्याची आपली महत्वाकांक्षा नव्हती असे नुकतेच जाहीर केले होते. पश्चिम बंगाल आणि तामिळनाडू या दोन प्रांतात पंतप्रधानांच्या भेटीच्या आधी थोडा वेळ पक्षांतर्गत वैमनस्ये प्रगट झाली होती याची दखल अनेक सदस्यानी घेतली होती. तामिळनाडूचा प्रश्न पंतप्रधानांनी आपल्या जेष्ठ सहकाऱ्यावरोबर चर्चिला अशी वोलवा होती.

सुब्रह्मण्यम् यांनी केलेल्या वक्तव्यावर व आरोपांवर काहीही बोलण्यास कामराजांनी नकार दिला. तांत्रिक कारणाचा आधार घेऊन सुब्रह्मण्यम् यांना वर्किंग कमिटीतून काढून टाकण्यासाठी त्यांना प्रदेशकाँग्रेसच्या अध्यक्षपदाचा राजिनामा देण्यास भाग पाडण्यात आले असे पुढील काळात स्पष्ट झाले.

**अखेर :**

पंतप्रधानांची शक्ती वाढत होती आणि उच्च नेतृत्व चिंताक्रांत होत होते. त्यांच्या महत्वाकांक्षेला आवर घालण्यासाठी काही तरी करणे आवश्यक होते. दिल्लीत चाललेला संघर्ष राज्यात पोचला होता व दोन्ही गट एकमेकांचे सामर्थ्य कमी करण्याच्या प्रयत्नात होते. तामिळनाडूत सिंडिकेटने प्रथम प्रहार केला तेथेच पंतप्रधानांनी प्रतिहल्ला चढविला. आपले विरोधक चारित्र्यहनन करीत असल्याचा आरोप करून ते प्रस्थापित हितसंबंध राखण्यासाठी आपल्यावर हल्ला चढवीत आहेत असे त्यांनी जाहीर केले. आपण निवडणुकीच्या वेळी रशियाकडून पैसा घेतला हा आरोप म्हणजे राष्ट्राचा अपमान आहे असेही संतापून त्या म्हणाल्या. पक्षशिस्तीविषयी बोलणारी माणसेच काँग्रेसचे धोरण आणि ठराव मानीत नव्हती असे त्यांनी दाखवून दिले. मद्रासला उद्योगपतींसमोर बोलताना, राष्ट्रीयकरण झालेल्या बँकानी समाजविरोधी गटांना कसलीही मुभा देऊ नये–कारण पूर्वी वाटेल तशी मिळणारी मदत ते अनैतिक फायद्यासाठी वापरीत–पण उत्पादक कार्यासाठी पैशाची कमतरता पडू नये अशा धोरणाचा उल्लेख केला. दुसऱ्या एका सभेत, संघटना व्यक्तिवादावर चालू शकणार नाही तर ती धोरणे व कार्यक्रम यावर उभारली गेली पाहिजे तरच ऐक्य, शिस्त व एकत्र कार्य करणे शक्य होईल असे मत त्यांनी व्यक्त केले.

**पुन्हा पेचप्रसंग :**

सहा आठवड्यांच्या शांततेनंतर परत वादांना रंग चढणार असे दिसू लागले. पंतप्रधान, चव्हाण व त्यांच्या गटाचे वर्किंग कमिटीचे सभासद यांनी



अनुक्रमणिका



निजलिंगप्पांनी कायदा आपल्या हाती घेऊन सुब्रह्मण्यम् आणि उत्तर प्रदेश नसेच आंध्र प्रदेश काँग्रेस कमिटीच्या अध्यक्षांना वर्किंग कमिटीबाहेर घालविण्याची कारवाई केली असा त्यांच्यावर आरोप केला. सुब्रह्मण्यम् यांनी राजिनामा दिल्यामुळे व दुसरे दोघे मंत्री झाल्यामुळे तिघांनीही आपले सदस्यत्व गमावले अशी अ. भा. कॉं. कमिटीच्या कार्यालयातून बातमी प्रसृत झाली होती. हा सर्व प्रकार पंतप्रधानांच्या गटाची संख्या कमी करण्यासाठी होता. निजलिंगप्पांनी तावडतोब पत्र लिहून त्या आरोपाचा इन्कार केला पण त्या तिघांच्या सभासदत्वाचा घटनेच्या अनुषंगाने विचार करावा लागेल असे कळविले.

त्यानंतर इंदिरा गांधी, चव्हाण, फकरुद्दिन अली अहमद, जगजीवनराम, सुब्रह्मण्यम् आणि उमाशंकर दीक्षित यांनी, एका पत्राने, राजकीय परिस्थितीचा विचार करण्यासाठी वर्किंग कमिटीची तावडतोबीने व अ. भा. कॉं. कमिटीची १७ नोव्हेंबरला संसद सुरु होण्यापूर्वी बैठक घेण्याची काँग्रेस अध्यक्षाकडे मागणी केली. अध्यक्षांनी ती अमान्य केली व वर्किंग कमिटीची बैठक ठरल्याप्रमाणे ३० ऑक्टोबरला होईल, आणि त्या बैठकीत अ. भा. काँग्रेस कमिटीच्या बैठकीची तारीख आणि जागा ठरविण्यात येईल असे जाहीर केले.

त्या पत्राचा अर्थ स्पष्ट होता. चव्हाण पंतप्रधानांना पाठिंबा देत होते· पक्षात परत फूट पडू नये, आणि वर्किंग कमिटीने सुब्रह्मण्यम् यांच्या प्रकरणाची पूर्ण चौकशी करीपर्यंत त्यांना वर्किंग कमिटीतून काढून टाकले जाऊ नये; वीस वर्षांपूर्वी केलेल्या काही नियमांनुसार त्यांना काढून टाकण्यात आल्यास परिस्थिती चिघळून २५ ऑगस्टचा ऐक्याचा ठराव अंमलात आणणे कठीण जाईल असे चव्हाणाना वाटत होते.

निजलिंगप्पांनी मात्र आपल्या पत्रात सुब्रह्मण्यम् यांना पत्र पाठविले नसल्याचे पण त्यांच्या राजिनाम्यामुळे त्यांचे वर्किंग कमिटीचे सभासदत्व रद्द होईल असे त्यांना कळविण्यात येणार असल्याचे स्पष्ट केले होते. तसेच " काँग्रेसचे ठराव रद्द होईपर्यंत अथवा बदलले जाईपर्यंत सर्वांवर बंधनकारक असतात, विशेषत: पक्षाच्या पद्धती आणि कार्य करण्याबाबतचे ठराव बंधनकारक असतात " असे पंतप्रधानाना कळविले. " काही काळ गेला म्हणजे घेतलेले निर्णय बंधनकारक रहात नाहीत असे तुम्हाला सुचवावयाचे आहे का ? ऐक्याच्या ठरावाची अंमलबजावणी करण्यासाठी मी कायदा हाती घेतला तर चालेल का ? पक्षाला ते योग्य वाटेल का ? राजकीय परिस्थितीचा पूर्णतया विचार करण्यासारखी वेळ येण्यासारखा परिस्थितीत काय फरक पडला ते मला स्पष्ट होत नाही ", असेही त्यांनी पंतप्रधानांना कळविले होते. सुब्रह्मण्यम् यांना काहीच कळविले नसता सात सह्यांचे पत्र का असे त्यांनी चव्हाणांनाही विचारले.



अनुक्रमणिका

वार्ताहरांनी चव्हाणांना त्यांनी पंतप्रधानांच्या गटात प्रवेश केला का असा प्रश्न विचारला त्याला त्यांनी उत्तरच दिले नाही. २५ ऑगस्टचा ठराव आपल्याला मान्य असून संघटनेला विघातक असे काही बोलले वा केले जाऊ नये अशी आपली इच्छा असल्याचे त्यांनी सांगितले. सुब्रह्मण्यम् यांना पत्रच गेले नसल्याने वर्किंग कमिटीच्या बैठकीची तारीख बदलण्याचे कारणच नव्हते, आपण सही केली याचा अर्थ बाजू बदलली असा नव्हता, आपण प्रत्येक प्रश्नाचा गुणवत्तेवर विचार करतो व आपली भूमिका ठरवितो असे ते म्हणाले. पंतप्रधानपद देऊ केल्याच्या मुद्द्यावर त्यांनी मौन स्वीकारले. सुब्रह्मण्यम् यांनी वेगळीच भूमिका घेतली. आपली नियुक्त अ. भा. कॉं. कमिटीने केली असल्यामुळे आपले सभासदत्व रद्द होत नाही असा त्यांनी अर्थ लावला. पक्षाचे ऐक्य व कार्य महत्त्वाची मानली जाऊन कोणतेही कृत्य पक्षपातीपणाचे आहे असे वाटेल असे नसावे अशी त्यांनी सूचना केली.

पंतप्रधान गटाने आणखी एक आघाडी उघडली, अ. भा. कॉं. कमिटीच्या बैठकीची मागणी करून, लौकर बैठक न घेण्याबाबत निजलिंगप्पांचा निषेध करावयाचा व वर्किंग कमिटीची बैठक अलीकडे ओढावयाची असा प्रयत्न सुरू झाला. निजलिंगप्पा अ. भा. कॉं. कमिटीसमोर जावयास घाबरत होते, वा त्यांना आपल्या पाठीमागे संघटित बळ उभे करावयाचे होते असा प्रचार सुरू झाला. पण १० ऑक्टोबरला निजलिंगप्पांनी वार्ताहरांजवळ त्या सर्व गोष्टींचा इन्कार करून निषेधाचा ठराव येणार म्हणून आपण मुळीच विचलित झालो नसल्याचे सांगितले. त्रिपाठी आणि वेंकटरत्नम् यांनी मंत्रीपदे स्वीकारल्यामुळे त्यांनी बेमुदत वर्किंग कमिटीत राहणे योग्य नव्हते, म्हणून त्यांना पत्रे पाठविणे आवश्यक होते, त्यांचे हे धोरण वर्किंग कमिटीच्या धोरणाशी मिळतेजुळते होते; तसे केले नसते तर अनेक कांग्रेसजनांनी आपण घटनेप्रमाणे वागत नाही अशी टीका केली असती ही आपली भूमिका त्यांनी विशद केली.

निजलिंगप्पा यांनी आपण कोणाच्याही दडपणामुळे ही कारवाई केली नसल्याचे सांगितले. पण हे स्पष्टीकरण येथेच थांबले नाही. मुंबईला श्री. पाटील यांनी सुब्रह्मण्यम् यांना वर्किंग कमिटीचे सभासदत्व परत मिळणारच नाही असे ठणकावून सांगितले. "त्यांची निवड सिंडिकेटने केली होती, पण आता त्यांचा पायाच उखडून टाकला गेला आहे, त्यामुळे त्यांना आता जागाच नाही," असे स्पष्ट उद्गार त्यांनी काढले. अध्यक्षांनी आपला सल्ला घेतला तो आपण पार्टील म्हणून नव्हे तर पक्षाची घटना करण्यात आपण भाग घेतला होता म्हणून असेही त्यांनी स्पष्ट केले. अध्यक्षांना आलेल्या पत्राबाबत त्यांनी आश्चर्य व्यक्त केले, "माझ्या पन्नास वर्षांच्या अनुभवात असा प्रकार कधी घडल्याचे मला माहीत नाही; एखाद्या मंत्र्याने पंतप्रधानाला मंत्रिमंडळाची बैठक घेण्यास सांगावे तसा हा प्रकार आहे," अशी आपली प्रतिक्रिया त्यांनी व्यक्त केली.





कृष्णम्माचारी मध्यस्थी करण्यास तयार होते. तरुण तुर्क मात्र स्पष्टपणे बोलू इच्छित होते, म्हणून चंद्रशेखर व कृष्णकांत यांनी एक संयुक्त पत्रक काढले. मूलभूत आर्थिक प्रश्नांवर राष्ट्रीय चर्चा घडवून आणण्याऐवजी जे शाब्दिक युद्ध चालले होते, त्याविषयी त्यांनी नाराजी व्यक्त केली. सूडबुद्धीने कृती केली जात होती, राजकीय क्षेत्रात डावपेच खेळले जात होते, पक्षाच्या घटनेचा तांत्रिक उपयोग करून संघटनेवर सत्ता टिकविण्यासाठीच्या संघर्षात तिचा उपयोग केला जात होता व सर्व नेतृत्वाची सर्व शक्ती त्यातच खर्च होत होती; वास्तविक यापेक्षा, राष्ट्रीयकरण झालेल्या बँका सामाजिक आणि आर्थिक बदलाची साधने म्हणून कशा वापरता येतील यावर राष्ट्रीय चर्चा घडवून आणण्याचा, त्यासाठी कार्यकर्त्यांची एक श्रेणी तयार करण्याचा, व मोठ्या प्रमाणावरच्या योजनांना जास्तीत जास्त साधनसामुग्री कशी पुरविता येईल व ती कशी मिळेल ते पाहण्याचा प्रयत्न करावयास हवा होता असा त्यांच्या पत्रकाचा मतितार्थ होता. त्यांच्या दृष्टीने जुन्या नेतृत्वाची उपयोगिता संपली होती. प्राप्त परिस्थितीत सामाजिक बदल घडवून आणणारे उपक्रमशील नेते म्हणून जुन्या नेतृत्वाचा उपयोग नव्हता, म्हणून जुन्या नेत्यांनी जितक्या लौकर नव्या शक्तींना वाव दिला असता, तितक्या प्रमाणात त्यांनी लोकशाही व समाजवाद यांच्या प्रगतीला हातभार लावला असता असे तरुण तुर्कांचे मत होते.

आतापर्यंत गप्प असलेल्या कामराजांनी, मद्रासमधील आपल्या वक्तव्यात, दिल्लीच्या शासकांनी भारतीय कम्युनिस्ट पक्षाच्या पाठिंब्यावर जगण्याच्या प्रयत्नात पडू नये असा इशारा दिला, त्या पाठिंब्यामुळे आणि काही काँग्रेसजनांना पुरोगामी म्हणण्यामुळे काँग्रेसचा घात होईल अशी सावधगिरीची सूचना दिली. कम्युनिस्ट पक्ष केरळातील मार्क्सवादी कम्युनिस्ट शासन उलथविण्याचा प्रयत्न करीत होता, (थोड्या दिवसांनी ते घडलेच), दोनतीन महिन्यानंतर पश्चिम बंगालमध्ये तसाच प्रयत्न होईल अशी त्यांना खात्री होती—जो पक्ष सहकारी पक्षांची सरकारे उलथण्याचा प्रयत्न करीत होता, त्या पक्षाकडून नुकतीच दोस्ती झालेल्या काँग्रेस पक्षाला कसे वागविले जाईल याबाबत निराळी अशी कोणती अपेक्षा करणे शक्य होते असा प्रश्न त्यांनी उपस्थित केला. टिकून राहण्यासाठी काँग्रेसला विरोधी पक्षावर अवलंबून रहावे लागण्याची परिस्थिती निर्माण झाली तर संघटनाच बंद करणे श्रेयस्कर असे उद्‌गार त्यांनी काढले. इंदिरा गांधींना पंतप्रधान करण्यासाठी आपण दोनदा प्रयत्न केला ही गोष्ट खरी असल्याचे सांगून, त्यांच्यावर टीका करण्याबाबत लोक आपल्याला आता दोष देतात हेही त्यांनी मान्य केले. पण त्याबरोबरच त्यांच्याविषयी सुरवातीला आपल्याला फार आशा वाटत होत्या पण मागून त्या धुळीस मिळाल्या असेही सांगितले व विघ्नेश्वराची मूर्ती घडविण्याच्या प्रयत्नात माकड निर्माण झाले असे ते म्हणाले.



अनुक्रमणिका

१३ ऑक्टोबरला निजलिंगप्पांनी विरोधकांवर कडक टीका केली व त्यांच्या समाधानासाठी आपण मुळीच राजिनामा देणार नाही असे जाहीर केले. " मी पक्षाचे अगर देशाचे काय वाईट केले आहे ते मला या लोकानी दाखवून द्यावे, मला शिव्या देणे हा एक फायदेशीर धंदाच झाला आहे, " " मला मारण्याकरिता त्यांना कोणतीही काठी चालते " असे उद्‌गार त्यांनी काढले पण कोणाचाही नाम-निर्देश करण्यात नकार दिला. काँग्रेसमध्ये मूलभूत मतभेद नाहीत असे स्पष्ट करून, आपल्यावरील टीकेबाबत कुसळाचे मुसळ केले गेले असल्याचे पण आपल्याला कोणावरही आरोप करावयाचे नसल्याचे त्यांनी सांगितले. नेत्यांनी स्वतःचा विचार न करता जनतेचा व देशाचा विचार केला तर सघर्ष थांबेल असा विश्वास प्रकट केला, शिस्त नसेल तर पक्ष टिकणार नाही या मुद्द्यावर जोर दिला. आपण, पाटील व कामराज यांना प्रतिगामी म्हणणाऱ्यावर टीका करून, राष्ट्रीयकरणाची मागणी करणारा पहिला जेष्ठ नेता कामराज नव्हता का असा त्यांनी सवाल केला.

काँग्रेसचे एक नेते व सोशॅलिस्ट फोरमचे आमंत्रक एस. एन. मिश्र यांनी पंतप्रधानांच्या पत्राला आक्षेप घेतला व ते पत्र लिहिण्याला आधारच नाही असे दाखविण्याचा यत्न केला. अध्यक्ष घटनेप्रमाणे वागत होते, ते तसे वागले नसते तर ते चुकीचे ठरले असते. काँग्रेसच्या उच्च नेतृत्वात गटबाजी असल्याचे सांगून प्रगतीचा मंदावलेला वेग परत कसा वाढविता येईल हे आपल्याला समजत नसल्याचे त्यांनी स्पष्ट सांगितले. आपण नाक्याजवळ पोचलो आहोत अशी खात्री पटली असल्यास, भांडत बसण्यापेक्षा विभक्त होणे बरे अशी त्यांनी सूचना केली.

याचवेळी गेली वीस वर्षे देश चुकीच्या मार्गाने जात असल्याचा कामराजांना साक्षात्कार झाला व देशाला पूर्वस्थितीवर आणण्यासाठी दक्षिणेत चळवळ करण्याचा आपला निर्धार त्यांनी व्यक्त केला, पण चळवळीचे स्वरूप व ती सुरू करण्याची वेळ याविषयी काहीच सांगितले नाही. १४ ऑक्टोबरच्या एका सभेत त्यांनी केंद्रातील शासक गटावर टीका केली. तो गट ज्या मार्गाने जात होता तो मार्ग चुकीचा असल्यास तो बदलण्यास त्याने मुळीच कांकू करू नये अशी त्यानी सूचना केली. त्याबाबतीत हट्टाने आणि उर्मटपणाने वागून भागण्यासारखे नव्हते. भीतीची भावना अशीच वाढत राहिली असती तर सत्तेवरील पक्ष बदलणे शक्य होणार नव्हते व तेथेच लोकशाहीचा अस्त होणार होता अशी भीती त्यांनी व्यक्त केली.

१५ ऑक्टोबरला पंतप्रधानांनी सिंडिकेट गटाच्या चार कनिष्ठ मंत्र्यांना मंत्रिमंडळातून काढून टाकले. त्याविषयी बोलताना मंत्रिमंडळात कोणाला ठेवावयाचे व कोणाला ठेवावयाचे नाही हे ठरविण्याचा अधिकार पंतप्रधानांचा असून त्याबाबत त्यांनी पार्लमेंटरी बोर्डाचा अगर आपला सल्ला घेतला नसल्याचे निजलिंगप्पांनी सांगितले. सुब्रह्मण्यम् यांना काढून टाकण्यामुळे असे झाले असेल

का या प्रश्नाला तसे कसे होईल एवढेच त्यानी उत्तर दिले. सिंडिकेट हा शब्द काही लोकानी दुष्टबुद्धीने वापरला असे सांगून शास्त्री व गांधी यांना पंतप्रधान केले त्यावेळी लोकाना सिंडिकेट चांगली वाटत होती फक्त आता मात्र सिंडिकेट-वर टीका होत आहे असे त्यानी सांगितले. काँग्रेस एकसंध्र व परिणामकारक होण्यासाठी शुद्धीकरण करण्याची आवश्यकता आहे का असा प्रश्न विचारला असता काँग्रेसमधील उणिवांचे शुद्धीकरण होणे आवश्यक आहे असे ते म्हणाले.

एकावेळी भारताचे सरन्यायाधीश असलेले सुबाराव यांनी सर्व राजकीय पक्षानी–लोकशाही व स्वातंत्र्यावर विश्वास असणाऱ्या पक्षानी–एकत्र येऊन लोक-शाही आघाडी उघडावी अशी सूचना केली. " निश्चित तत्वांवर राजकीय पक्षांचे ध्रुवीकरण ही आजची गरज आहे; लोकशाहीत राष्ट्रीय पक्षाला वाव नसतो, ध्रुवी-करणामुळे काही काळ गोंधळ झाला तरी देशाला केव्हा ना केव्हातरी त्यातून जावे लागेल म्हणून ते मागाहून होण्यापेक्षा आताच झालेले बरे असे त्यांनी उद्गार काढले.

निजलिंगप्पांच्या ऐवजी आपल्या गटाचा अध्यक्ष वर्ष संपावयाच्या आत निवडून आणण्याचा निर्णय पंतप्रधानांच्या गटाने घेतल्यामुळे संघर्षात भर पडली. डिसेंबरच्या आत अ.भा.काँ. कमिटीची सभा घ्यावी अशी मागणी करण्याच्या अर्जा-वर निदान चारशे सभासदांच्या सह्या घेण्यासाठी त्या गटाने निरनिराळ्या राज्यात दौरा काढला. फरिदाबादला वर्किंग कमिटीने निजलिंगप्पांची मुदत १९७० पर्यंत वाढविली होती तो ठराव रद्दबातल करण्याची पंतप्रधान गटाची योजना होती. सुब्रह्मण्यम् वगैरेना काढून टाकण्याचा निर्णय चव्हाणांना आवडला नव्हता, कारण ऐक्याच्या ठरावाशी तो सुसंगत नव्हता असे त्यांचे मत होते. निजलिंगप्पांना काढून टाकण्याची मागणी ज्या बैठकीत करण्यात आली त्या बैठकीला चव्हाण हजर होते व त्या मागणीच्या पत्रावर वर्किंग कमिटीच्या काही सदस्यांच्या सह्या होत्या.

असे असले तरी संसदेच्या अधिवेशनापूर्वी दोन्ही गटात उघड संघर्ष होईल असे निदान १८ ऑक्टोबरपर्यंत तरी निजलिंगप्पांना वाटले नसावे. त्यांना काढून टाकावयाच्या मागणीबाबत त्यांना काहीच म्हणावयाचे नव्हते; पक्षाने त्याना निवडून दिले होते व त्यांचे काय करावयाचे ते पक्षच ठरविणार होता. नियुक्त केलेल्या सभासदांना काढून टाकणार का या प्रश्नाला त्यांनी उत्तर दिले नव्हते. मात्र दिल्लीला एक नवे सिंडिकेट काम करीत असावे असे उद्गार त्यांनी काढले होते. ते सिंडिकेट प्रथम दोघांचे नंतर तिघांचे व मागाहून सहा जणांचे झाले आहे असा शेराही मारला होता. दोन्ही गटातील इतर सभासदांचे वाग्युद्ध चालूच राहिले.

२१ ऑक्टोबरला एका गटाची दिल्लीला तर दुसऱ्या गटाची बंगलोरला बैठक झाली. पंतप्रधानाना मंत्रिमंडळ गडगडण्याची भीती नव्हती, कारण संघटना गटाच्या पन्नास सभासदांऐवजी इतर गटांच्या पन्नासांचा पाठिंबा त्यांना मिळणार होता. तडजोड करावयाला त्यांची मुळीच तयारी नव्हती कारण असे प्रयत्न

फसतील असे त्यांना वाटत होते. चव्हाणांनी यावेळी तडजोड करण्यासाठी काही मार्ग काढण्याचा वा मसुदा तयार करण्याचा प्रयत्न केला नाही, तसे काही करण्याचा त्यांचा इरादाही नव्हता त्यामुळे वर्किंग कमिटीत समोरासमोर संघर्ष होणार याबाबत निश्चिती वाटू लागली होती.

बंगलोरला निजलिंगप्पा, रेड्डी आणि कामराज यांची बैठक झाली. मिश्र, गुरुपादस्वामी, व नागप्पा आल्वा हे अध्यक्षांना भेटून गेले. " मला सद्या जमविणे आवडत नाही, वर्किंग कमिटीला ते आवडणार नाही, तसेच तो शिस्तीचाही प्रश्न आहे " असे मत त्यांनी आधीच व्यक्त केले होते. त्यांना पक्षाच्या झालेल्या स्थितीबाबत वाईट वाटत होते. " सत्तेने आपणा सर्वांना विघडवले आहे, समाजवाद आणण्यापेक्षा आपले स्थान व अधिकार टिकविण्याकडे प्रत्येकाचे लक्ष आहे; आमच्या उणिवा त्याला कारणीभूत आहेत " असे ते वैतागून बोलले. इंदिरा गांधींकडे अध्यक्षपद देण्याचा विचार कधीच नव्हता, अध्यक्ष घटनेनुसार निवडून यावयास पाहिजे, जे नेहरूंच्या काळात शक्य झाले नाही ते आता होणे शक्य नव्हते, आपल्या अनुयायांना कडक धोरण स्वीकारण्याचा सल्ला दिला होता, पण आपण अनेकांचे ऐकले तरी निर्णय मात्र आपल्या मतानुसारच घेतो इत्यादी गोष्टीही त्यांनी स्पष्ट केल्या.

राममुभगसिंगानी अध्यक्षांना काढून टाकण्याच्या मागणीला विरोध करून, अशा मागणीने व ठरावाने सामान्य सभासदांचा पक्षावरील व नेत्यावरील विश्वास ढळेल व पक्षाचे अनहित होईल, ऐक्याशिवाय धोरणे अंमलात आणणे कठीण होईल असे मत व्यक्त केले व दोन्ही गटांनी संघर्ष थांबवावा असे पंतप्रधानाना पटवून देण्याचा प्रयत्न केला पण पंतप्रधान स्वस्थ होत्या. मात्र एका परदेशीय वार्ताहराशी बोलताना कांग्रेस मध्यममार्गी राहील, कारण फार डावीकडे गेल्यास उजव्या प्रतिगाम्यांचा तीव्र विरोध होईल, फार उजवीकडे झुकल्यास जनता खवळेल पण मक्तेदारीशी लढा केल्याशिवाय कांग्रेसला भवितव्य राहणार नाही असे विचार प्रकट केले.

हितेंद्र देसाई व राममुभगसिंग यांनी पंतप्रधान व काँग्रेसचे अध्यक्ष यांची बैठक व्हावी असे सुचविले पण संघटनेत आमूलाग्र बदल घडावा म्हणून अध्यक्षांनी राजिनामा द्यावा असा पंतप्रधानांच्या सल्लागारानी आग्रह धरला. गुजरातमधील जातीय परिस्थितीची चर्चा करण्यासाठी आलेल्या हितेंद्रानी संघर्ष टाळावा अशी पंतप्रधानाना विनंती केली पण आपण मध्यस्थी करण्यासाठी आलो नाही हे स्पष्टपणे सांगितले. राममुभगसिंग पंतप्रधान व चव्हाण या दोघांना भेटले व ऐक्यासाठी होणाऱ्या प्रयत्नाना आपला पाठिंबा राहील असे त्यानी आश्वासन दिले. पंतप्रधानांनी अध्यक्ष होण्याची सूचना—पंतप्रधानपद, नियोजनमंडळाचे अध्यक्षपद आणि अर्थखाते—त्यांच्याकडे असल्यामुळे फेटाळून लावली.

—क्रमश:







# प्रासंगिक टिपणे

## कादंबरी-एक वाङ्मयप्रकार काही विचार

—सदानंद वसणकर

नाटकांचे दोन प्रकार :

आपण मागे असे म्हटले की पूर्वींच्या कादंबऱ्यात अॅक्शनवर-प्रत्यक्ष घटनांवर अधिक भर देण्यात येत असे. त्याच्या उलट आताच्या कादंबऱ्यांत काँटेम्प्लेशनवर बौद्धिक चिंतनांवर अधिक भर देण्यात येतो. हाच मुद्दा अधिक विस्ताराने आपणास आता पाहावयाचा आहे. मात्र कादंबरीऐवजी नाटकाच्या पृथक्करणातून तो आपण समजावून घेऊ. सामान्यतः नाटकात दोन भिन्न प्रकार आपल्या दृष्टीस पडतात. एक क्लासिकल नाटकांचा-ट्रॅजेडींचा, आणि दुसरा पॉप्युलर किंवा जनता-नाटकांचा. येथें आपण नाटकांचा विचार मुद्दामच, करीत आहोत. कारण माणसाच्या सर्व-साधारण आवडीनिवडी नाटकांच्या बाबतीत अगदी स्पष्ट दिसू शकतात. येथे आरंभीच एक गोष्ट स्पष्ट करावयास हवी, ती ही की क्लासिकल आणि जनता असे नाटकांचे दोन प्रकार आम्ही करीत असलो तर हे नाटकांचे मूल्यमापन नाही. कसल्याच प्रकारचे मूल्यमापन आपणास येथे अभिप्रेत नाही.

नाटकातला क्लासिकल आणि जनता हा भेद इतका स्पष्ट आहे की विना-सायासही आपण तो ओळखू शकतो. क्लासिकल नाटकांना जें लोक जातील ते जनता नाटकांकडे ढुंकूनदेखील पाहणार नाहीत. उलट जनता नाटकांचे प्रेक्षक क्लासिकल नाटकांकडे चुकूनही वळणार नाहीत. तेव्हा अभिरुचीचा मुद्दा विचारात घेऊन आपण असे म्हणू शकतो की ज्यानी आपली अभिरुची तरबेज केली आहे असे लोक ट्रॅजेडीकडे वळतात तर ज्याना फक्त करमणूक हवी असते असे लोक जनता-नाटकांकडे वळतात. आवडीचा मुद्दा विचारात घेता आणखी एक निष्कर्ष निघतो. तो असा की ट्रॅजेडींचे सौंदर्यविषयक प्रयोजन हे जनता-नाटकांच्या सौंदर्यविषयक प्रयोजनापेक्षा सर्वस्वी वेगळे आहे. अर्थात येथें आपण आदर्श साऱ्यांचा विचार करीत आहोत. फारच थोडी नाटके अशा निर्विवाद स्वरूपाची असू शकतात.

क्लासिकल नाटकात अॅक्शनला फारसा वाव असत नाही, ( हे अर्थात काळ, स्थळ आणि प्रसंग यांच्यातील नैसर्गिक सुसंगतता एवढ्याच केवळ अर्थाने मी

म्हणत नाही. तर इतरही अनेक प्रकारे हे सूत्र खरे असते.) क्लासिकल नाटकांची कथा अगदी अल्पस्वल्प असते तर जनता–नाटकांत ॲक्शनच ॲक्शन आढळते. जनता–नाटकांच्या कथा चांगल्या लंब्याचवड्या असतात. या नाटकात घटना येतील नितक्या कमीच ! रोमहर्षक प्रसंगांची तेथे अगदी रेलचेल असते. दैवाचे खेळ तर हवे तितके घाला, हा प्रेक्षकवर्ग, त्याना कंटाळत म्हणून नाही. जण काही प्रत्यक्ष जीवनात आधीच उत्तेजित झालेल्या प्रेक्षकाला अधिक उत्तेजित करण्याची जबाबदारीच या प्रकारच्या नाटकात नाटककारानी स्वतःवर घेतलेली असते. 'ट्रॅजेडी' 'ऐतिहासिक कथानकावर' आधारलेल्या असतात. ही 'ऐतिहासिक कथानके' (इतिहास) लोकाना आधीच अवगत असल्याने नाट्यात्मक अर्थाने चित्तवेधक असे त्यात जवळजवळ काहीच असत नाही. खरे तर नाटककारानी ह्या कथा मनोरंजनासाठी निवडलेल्याच नसतात. त्या कथांच्या माहात्म्याने त्याना काही ना काही महत्त्वाच्या कल्पना ( मोटिव्हज् ) रंगभूमीवर मांडायच्या असतात. कोठल्याही प्रकारच्या शारिरीक पराक्रमांचे वर्णन करण्यात या नाटककाराना रस नसल्याने जनता–नाटकात ज्या प्रकारच्या उत्तेजक घटना दाखविण्यात येतात तशा उत्तेजक घटना येथे अजिबात पाहावयास सापडत नाहीत. नाटकाच्या रूपाने मांडण्यासाठी जे तीनचार प्रसंग ट्रॅजेडीचा नाटककार निवडतो ते कथानक रंगविण्यापेक्षा त्यातील पात्रांच्या आंतरीक समस्या रंगविण्यासाठी तो निवडीत असतो. या नाटककाराला खरी आस्था नायक–नायिकांच्या भौतिक दैवभोगात नसून त्यांच्या मानसिक संघर्षात असते. या नाटकांचे नाटककार आणि प्रेक्षकदेखिल पात्रांच्या मनःक्षोभात वा त्यांच्या आपापसातल्या संघर्षात रस घेण्यासाठी तेथे आलेले नसतात. त्यांचे समाधान आणि आनंद पात्रांच्या मनोविकारांचे जे सूक्ष्म आणि तरल विश्लेषण नाटककाराने केलेले असते त्यात असते. याच्या उलट स्थिती जनता–नाटकांची आहे. तेथे पात्रांचे मनोविश्लेषण वा त्यांच्या मनोविकारांचे पृथक्करण यात कोणालाच गम्य असत नाही. एवढेच नव्हे तर नाटककाराने तसले काही दाखविण्याचा जर प्रयत्न केला तर त्या नाटकाचा प्रेक्षकवर्ग त्याला पार कंटाळूनच जाईल. जनता–नाटकांच्या लेखकाला आणि प्रेक्षकांनाही जीवनाच्या बौद्धिक चिंतनात अजिबात रस नसतो. त्याना उत्तेजक घटना, प्रक्षोभक मनोविकार असे काही सनसनाटी पाहावयास हवे असते.

वर आपण म्हटले की क्लासिकल नाटकांमध्ये घटनांसाठी घटनाना किंवा कथांसाठी कथाना महत्व नसते. घटना तेथे पात्रांच्या स्वभावपरिपोषासाठी आणि त्यांचे मानसिक विश्लेषण करण्यासाठी निवडण्यात आलेल्या असतात. म्हणूनच अगदी थोड्या घटनांच्या आधारेही ही नाटके रचली जाऊ शकतात. ॲक्शन वा प्रत्यक्ष बाह्य घटनांपेक्षाही त्या घटनात भाग घेणाऱ्या पात्रांच्या स्वभाववैशिष्ट्याला आणि वैचारीक व भावनिक संघर्षाला तेथे अधिक महत्व असते.







अर्थात याचा अर्थ असा नाही की ही नाटके केवळ मानसशास्त्रीय विश्लेषणासाठी वगैरे लिहिली जात असतात. तसे म्हणणे वावगे ठरेल. या नाटकांचे महत्वाचे प्रयोजन म्हणजे त्यांच्या विवक्षित प्रेक्षकवर्गाला नैतिक आणि आचारविचार-विषयक आदर्श पुरविणे. ट्रॅजेडीतली पात्रे आदर्श स्वरूपाची आणि अनुकरणीय अशी असतात. ट्रॅजेडींचा प्रेक्षकवर्ग ट्रॅजेडींकडून नैतिक धडे घेण्यासाठी येतो. ट्रॅजेडीतले नायक-नायिका ही मोठ्या खंबीर मनाची दाखविण्यात येतात. ती सहजासहजी भावनावश होत नाहीत. एवढेच नव्हे तर त्यांच्यावर कसलाही जरी कठीण प्रसंग गुदरला तरी स्वतःचा धर्म ती सोडीत नाहीत आणि स्वतःच्या उच्च स्थानावरून खालीही ती उतरत नाहीत. त्यांचे धैर्य आणि मोठेपण त्याना केव्हाही सोडून जात नाही. ट्रॅजेडींचा प्रेक्षकवर्गही ट्रॅजेडींना शोभण्यासारखाच असतो. हा प्रेक्षकवर्ग स्वतःचे भान ठेवून जगणारा असल्याने नायिकेच्या दुःखाने तो विव्हल होणार नसतो. भावविव्हल होणे हा त्याचा स्वभावच नसतो. ट्रॅजेडीतला नायक किंवा नायिका स्वतःच्या स्वाभाविक मोठेपणाने वागतात-जगतात आणि ट्रॅजेडींचा प्रेक्षक तेच त्यांचे स्वाभिमानी व उदात्त वागणे-जगणे पाहाण्यासाठी तेथें जमतो.

ट्रॅजेडी आणि जनता–नाटके यांची जर तुलना केली तर असे दिसून येईल की ट्रॅजेडीत जीवनाचे अवगाहन (कॉंटेंप्लेशन) असते. जनता–नाटकात विकारांची वेहोषी असते. जनता–नाटकाच्या कथावस्तूत नैतिक समस्या सहसा आढळत नाहीत, म्हणजेच नैतिक संघर्षांच्या दृष्टीने पाहाता ही नाटके उदासिन–तटस्थ म्हणावी लागतात. याच्या उलट ट्रॅजेडींचे आहे. ट्रॅजेडी अशा प्रकारच्या समस्यांविना लिहिल्याच जाऊ शकणार नाहीत. ट्रॅजेडींचा नायक हा स्फूर्तीदाताच असावा लागतो. तो खऱ्या अर्थाने नरश्रेष्ठ–हिरो असतो. या नाटकातून फक्त राजेलोक वा त्यांच्या बरोबरीची मंडळी (अॅरिस्टाक्रॅट्स्च) येऊ शकतात. (अर्थात केवळ जन्माने नव्हे तर रुचीने) सर्वसामान्य माणसाना, त्यांच्या संसारिक जीवनाला व त्यातल्या सामान्य घटनाना या नाटकात स्थानच असू शकत नाही. जनता–नाटकात जे प्रसंग वगैरे चितारले जातात त्यात नैतिक संघर्षाचा भाग जवळपास नसतोच! याच्या उलट ट्रॅजेडीत नायक–नायिकांच्या ज्या प्रतिक्रिया दाखविण्यात येतात त्या आदर्शस्वरूपाच्या असतात. म्हणजेच "ट्रॅजेडीतले प्रसंग हे नैतिक संघर्षाच्या स्वरूपाचे असतात. त्याचमुळे या नाटकातून येणारी पात्रे ही राजेलोक व त्यांच्या बरोबरीची मंडळी अशीच फक्त असतात. याचे कारण असे की धकाधकीच्या जीवनापासून ही मंडळी मोकळी असतात. सर्वसामान्य संसारीक काळज्या व चिंता त्याना नसतात. आणि त्याचमुळे बारीकसारीक गोष्टीत त्यांच्या शक्तीचा अपव्यय होत नाही. ही शक्ती ते नैतिक प्रश्नाशी झगडण्यात खर्च करू शकतात. ज्या काळात या ट्रॅजेडी रंगभूमीवर आल्या त्या काळातला समाज

आपणास जरी प्रत्यक्ष पाहाता आला नाही तरी ट्रॅजेडींच्या प्रेक्षकवर्गासंबंधी आपण काही अंदाज निश्चित बांधू शकतो. स्वाभिमान आणि वागण्याची रीतभात, थोडक्यात स्वतःची सार्वजनिक प्रतिमा यासंबंधी या प्रेक्षकवर्गाच्या काही निश्चित कल्पना असल्या पाहिजेत. या कल्पना बऱ्याच प्रगल्भ असाव्यात. औचित्य आणि बाह्य शिष्टाचाराला त्यांच्या लेखी फार महत्व असावे. ट्रॅजेडींची शैली संयमित आहे. कोठेही ती मर्यादा भंग करीत नाही. ग्राम्यता तेथे अजिबात आढळत नाही. ग्राम्यतेमुळे कधी कधी प्रसंगाला जिवंतपणा येतो हे खरे असले तरीही या प्रकारच्या ग्राम्यतेला ट्रॅजेडीत स्थान नसते. तसेच बेहोषीलाही तेथे वाव नसतो. मनोविकार तेथे कधीही हाताबाहेर जात नाहीत. वागण्याबोलण्यावर एक प्रकारचे उदात्त नियंत्रण तेथे पाहावयास सापडते. शिस्त, आंतरिक वळण हा येथल्या प्रेक्षकाच्या जीवनाचा कायदा आहे.

याच्या उलट जनता—नाटके आणि बहुजनसमाजाची परिस्थिती असते. प्रत्येक क्षेत्रात या मंडळीना बेहोषी हवी असते. बहुजनसमाजाचे धार्मिक सण आणि उत्सव घ्या. त्यातही तुम्हाला कोलाहल आणि गडबड यांचेच वर्चस्व आढळेल. मंत्र, तंत्र, बळी, नाच, गाणे, बेहोषी या अतिरेकाला मोजकी माणसे-की ज्यांच्या आवडीनिवडी विकसित झालेल्या आहेत—विरोध करताना दिसतात. भारतात ब्राह्मणमंडळी जारणमारण—मंत्रतंत्रादींना विरोध करतात. प्राचीन चीन-मध्ये कन्फ्युशिअनवादी, मांदारिन ताओवादी अंधश्रद्धांच्या बाबतीत तेच करतात. कॅथॉलिक धर्ममंडळे गूढवाद्यांच्या बेहोषीला तसाच विरोध करतात. जीवनाकडे पाहाण्याचे आणि वागण्याचे हे दोन प्रधान जिवंत मार्ग आहेत. संपूर्णपणे परस्पर-विरोधी, एकात आत्मसंयमन आणि आत्मशिस्तीला महत्त्व आहे. आदर्श, उत्तम जीवन म्हणजे आत्मसंयमित जीवन. दुसऱ्या म्हणजे पॉप्युलर दृष्टिकोनात उत्तम जीवन म्हणजे भावनावश जीवन. मनोविकारांचा अतिरेक, नाचगाणे, दारूची धुंदी आणि या सर्वातून निर्माण होणारी मनाची बेहोष अवस्था. माणसाच्या बाबतीत फक्त एवढ्याच दोन प्रधान प्रवृत्ती आढळतात. आत्मसंयमन आणि बेहोषी.

या प्रवृत्तींच्या बऱ्यावाईटाचा विचार येथे आपणास अभिप्रेत नाही. आपणास फक्त एवढेच म्हणायचे आहे की माणसांचा विचार करता या दोन प्रकारची माणसे जगात आढळतात. सामान्य जनतेला संयम आणि निवडीत काहीही आस्था वाटत नाही. त्याना तीव्र मनोविकार आणि बेभानपणा यात रस वाटतो. जगात या दोन परस्परविरोधी प्रवृत्ती आपणास दिसतात.

तीव्र मनोविकाराना आणि भावनिक बेभानपणाला प्राथमिक स्थान देणाऱ्या नाटकातली पात्रे साहजिकच अस्पष्ट उतरणार असतात. कारण या प्रकारच्या नाटकात व्यक्तिरेखाना महत्व नसून त्यांच्या आयुष्यात जे प्रसंग घडतात त्याना

महत्त्व असते. प्रसंग चित्तवेधक असतील तर ती पात्रे व ते नाटकही चित्तवेधक बनेल. प्रसंग तेथे पात्राना घडवितात. पात्रांवर प्रभाव प्रसंगांचा असतो. ट्रॅजेडीत पात्रांच्या प्रतिक्रियाना महत्त्व असते. या प्रतिक्रिया पात्रांच्या स्वाधीन असतात. पात्रांच्या ताब्यात असतात. प्रसंग त्या पात्राना हालवू शकत नाहीत. म्हणजेच ट्रॅजेडीत पात्रांच्या खंबीरपणावर जास्त भर असतो व असा भर असल्याने ही पात्रे ठळक असतात, उठून दिसतात. जनता-नाटकातल्या पात्रांची अदलाबदल शक्य असते. तशी अदलाबदल येथे शक्य नाही. ट्रॅजेडीतल्या व्यक्तिरेखाना आपापले स्वत्व असते. थोडक्यात, जनता-नाटकात घटनांवर-ॲक्शनवर भर असतो. ट्रॅजेडीत व्यक्तित्वावर भर असतो. जनता-नाटकातल्या पात्रांच्या बाबतीत त्यांच्या व्यक्तिरेखा, किंवा त्यांचे वागणे याना महत्त्व नसते तर त्यांच्या बाबतीत जे प्रसंग घडतात त्याना महत्व असते. या प्रसंगामुळे ती नाटके चित्तवेधक ठरतात. बौद्धिक चिंतनाला येथे अजिबात स्थान असत नाही. आणि ते बरोबरच आहे म्हणा. चिंतनासाठी मानसिक अलिप्तपणा लागतो. डोके थंड ठेवावे लागते. चिंतनाचा विषय आणि आपण यात अंतर राखावे लागते. घो, घो वेगाने वाहणाऱ्या प्रवाही लोंढ्याचे जर निरिक्षण करायचे असेल तर त्या लोंढ्याबरोबर वाहून जाऊन भागणार नाही.

हे नाटचप्रकार दोन. एक ट्रॅजेडी. दुसरे-जनता नाटक. दोन अगदी वेग-वेगळ्या प्रकारची कलाविषयक प्रयोजने या दोहोत आढळतात. एकात सारा भर ॲक्शनवर-घटनांवर-नायकनायिकांवर कोसळणाऱ्या संकटांवर, त्यांच्या तीव्र मनोविकारांवर, वगैरे. ट्रॅजेडीत सारा भर व्यक्तिरेखांवर, पात्रांवर, त्यांच्या अनुकरणीय आणि आदर्श वर्तनावर. ट्रॅजेडीतले एकएक पात्र म्हणजे एकएक जणू कातीव शिल्प. जनता-नाटके म्हणजे कॅनव्हासवरची रंगीत चित्रे. काहीशी धूसर, अस्पष्ट. पार्श्वभूमी आणि सगळी चौकटच जर विचारात घेतली तर जिवंत होणारी.

दोन कला : मोठमोठ्या व्यक्तित्वांची कला विरुद्ध केवळ शारिरीक धाडसांची कला. माझ्या मते आपल्या काळात कादंबरीचा कल निव्वळ चित्त-वेधक धाडसांकडून कातीव व्यक्तिरेखांकडे होत असल्याचे दिसते. केवळ चित्त-वेधक कथानके रचण्याऐवजी मोठ्या व्यक्तिरेखा तयार करण्याकडे कादंबरी-काराने आता वळले पाहिजे. कारण चित्तवेधक कथानके रचता येणे आता प्राय: अशक्यप्राय बनले आहे. अशा प्रकारचा सगळा मालमसाला आधीच संपून गेला आहे. लहान मूल केवळ शारिरीक धडपडीतूनही उत्तेजित बनू शकते. पण जसजसे ते वाढू लागते तसतसा शारिरीक उत्तेजितपणाचा आनंद त्याला कमी प्रतीचा वाटू लागतो. प्रौढाला शारिरीकाच्या पाठीमागील बौद्धिकाचा हव्यास असतो.



अनुक्रमणिका



## डोस्टोव्हस्की आणि प्रुस्त :

मागच्या काळातल्या अनेक कादंबरीकारांची नावे काळाच्या उदरात गडप होऊन जात आहेत तरीपण डोस्टोव्हस्कीचे नाव मात्र अधिकाधिक प्रकाशाने चमकत आहे. डोस्टोव्हस्कीच्या प्रभावाची कारणमीमांसा अनेकानी केली आहे. काहीजण म्हणतात की डोस्टोव्हस्कीची कथानकेच इतकी चित्तवेधक आहेत की वाचावयास सुरवात करताच वाचकाच्या मनाची पक्कड ती घेतात. म्हणजेच नाटयपूर्ण कथानकांमुळे डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्या प्रभावी झाल्या आहेत. इतर कोणी म्हणतात की डोस्टोव्हस्कीची पात्रे विकृत, रोगट असल्याने ती चित्तवेधक वाटतात. कारण अशी पात्रे आपणाला सर्वस्वी अपरिचित असल्याने त्यांच्याविषयी आपणास कुतूहल वाटते. थोडक्यात डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यात त्याने जे साहित्य वापरले आहे त्यामुळे या कादंबऱ्या मनोवेधक बनतात असे हे मत सांगते. माझे मत यापेक्षा वेगळे आहे. कथानकाचा मनोवेधकपणा, किंवा पात्रांचा वेगळेपणा हे विशेष असे आहेत की त्यांच्यामुळे कादंबरी **मोठी बनलीच** पाहिजे असे म्हणता येणार नाही. कादंबरीच्या मोठेपणासाठी ते अपरिहार्यच आहेत असे नाही. त्यांच्यापायी कादंबरीला कदाचित उणेपणाही येऊ शकेल. हे विशेष आपणास आकर्षित करतात तशाच प्रकारे परावृत्तही करतात.

कलाकृतीच्या बाबतीत एक गोष्ट नेहमी आठवणीत ठेवण्यासारखी आहे. ती म्हणजे कादंबरीचा केवळ विषय उत्तम आणि मनोवेधक आहे म्हणून ती कादंबरी उत्तम बनेलच असे नाही. केवळ कादंबरीत वापरण्यात आलेल्या सामुग्रीवर कादंबरीचा मोठेपणा अवलंबून नसतो. त्या सामुग्रीवर कादंबरी टिकून राहात नाही. कादंबरीचे मोठेपण तिच्या फॉर्मवर, तिच्या जडणघडणीवर, तिच्या आकृतिबंधावर—ऑरगॅनिझमवर अवलंबून असते. कादंबरीच्या बाबतीत खरा कलात्मक भाग म्हणजे हा आकृतिबंध, त्या कादंबरीची रचना, हाताळणी, सौंदर्यविषयक वा वाङ्मयीन टीकेत खरोखर याच घटकावर लक्ष केंद्रित केले गेले पाहिजे. पेंटिंग वा काव्यात जर फक्त विषयालाच सगळे महत्व देण्यात आले असले तर जाणकार लोक त्यातील गद्यपणाला हासतात. कारण विषय महत्वाचा असला तरी सर्वाधिक महत्वाचा नाही. काव्य, पेंटिंग, कादंबरी यात विषय महत्वाचा आहे ही गोष्ट आपण नाकारू शकत नाही. विषयच नसेल तर कोठलीही कलाकृती उभीच राहू शकणार नाही. रासायनिक क्रियाप्रक्रियेवाचून ज्याप्रमाणे जीवन ही गोष्टच अशक्य आहे तशाच प्रकारे विषयावाचून कथा-कादंबरी, काव्यादी कलाकृतीही अशक्य असतात. परंतु त्याजबरोबर हीही गोष्ट विसरून चालणार नाही की केवळ रासायनिक प्रक्रिया म्हणजे जीवन नाही. जीवन हे रासायनिक क्रियाप्रक्रिया अधिक त्या रासायनिक क्रियाप्रक्रियेवर त्या जीवनाने उभारलेली नवी आणि अधिक गुंतागुंतीची ओरिजिनल व्यवस्था, त्याचप्रकारे

कलाकृती म्हणजेदेखिल कलाकृतीची विषयसामुग्री आणि त्या सामुग्रीवर त्या कलाकृतीने उमटविलेला आकृतिबंध-फॉर्म.

वास्तविक कलाकृतीचा प्राण तिच्या आकृतिबंधात आहे ही गोष्ट मान्य व्हावयास कठीण पडू नये. अर्थात कलाकृतीच्या बाबतीत आकृतिबंधाचे महत्व अनज्ञ अशा सामान्य रसिकाना फारसे वाटू नये हे ठीकच आहे. त्यांच्या दृष्टीने आकृतिबंध ही एक अमूर्त, शब्दात आणि संकल्पनात व्यवस्थित मांडता न येणारी गोष्ट असल्याने कलाकृतीच्या दृष्टीने अपरिणामकारक वस्तू असली तर त्याचे नवल नाही. कारण विषय जसा झटकन लक्षात येऊ शकतो तसा आकृतिबंध झटकन लक्षात येत नाही. आकृतिबंध असतो पण डोळयाना दिसत नाही. परंतु कलाकृतीचा निर्माता आणि समीक्षक यांची गोष्ट तशी नाही. त्याना कलाकृतीच्या संदर्भातले आकृतिबंधाचे महत्व माहित असावयास हवे. अजाणकार वाचकाच्या दृष्टीने कलाकृतीचा एकत्रित आणि अंतिम परिणाम महत्वाचा असल्याने कलाकृतीचा आस्वाद घेताना जो आनंद त्याला झालेला असतो त्या आनंदाचे विश्लेपण करण्याची गरजच त्याला वाटत नसते. त्याच्या दृष्टीने आनंद हीच फक्त महत्वाची गोष्ट असते. आणि हा आनंद कसा मिळाला या प्रश्नात तो शिरत नाही. अशा प्रकारच्या मूलभूत प्रश्नातच त्याला रस नसतो. हे काम कलावंत आणि समीक्षकाचे आहे.

डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यातले प्रसंग असाधारण आहेत ही गोष्ट तर खरीच. तसेच त्यात आलेले मनोविकारही अत्यंत तीव्र आहेत. डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यातील हे असाधारण प्रसंग व तीव्र मनोविकार वाचून अनेक टीकाकाराना असे वाटते की डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यात यानाच सर्वाधिक महत्त्व आहे. विषय आणि ही सगळी सामुग्री हीच येथे महत्त्वाची आहे. ज्या आकृतिबंधात ही सामुग्री बसविली आहे त्या आकृतिबंधाला एकूण कादंबऱ्यांच्या यशाच्या दृष्टीने काहीही महत्त्व नाही. टीकाकार डोस्टोव्हस्कीच्या साहित्यकृतींच्या आकृतिबंधाकडे दुर्लक्ष करतात. त्याना असे वाटते की डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्या मोठ्या आहेत कारण त्यात आलेली सामुग्री अनोळखी आणि जगावेगळी आहे. त्यातील प्रसंग असाधारण आहेत. थोडक्यात, त्यांच्या दृष्टीने डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यांचा आकृतिबंध ही एक मामुली गोष्ट आहे. केवळ अपघात किंवा दैवयोग. डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यांच्या मोठेपणाशी त्याचा काहीही संबंध नाही. त्याच्याही पुढे जाऊन काही टीकाकार तर असेही म्हणतात की डोस्टोव्हस्कीची पात्रे अफलातून आहेत कारण ती खुद्द डोस्टोव्हस्कीवरच बेतलेली आहेत. डोस्टोव्हस्कीला मधूनमधून फेफऱ्याचे झटके येत असत. या टीकाकारांच्या मते खुद्द डोस्टोव्हस्की हे स्वतःच त्याच्या कथाकादंबऱ्यातले आणखी एक पात्र आहे. डोस्टोव्हस्कीचे व्यक्तित्व अशा प्रकारे प्रक्षुब्ध होते म्हणून त्याची पात्रेही प्रक्षुब्ध व नजरेत भरणारी आहेत. फेफऱ्याच्या

घुंटीत ही पात्रे डोस्टोव्हस्कीने रचली आहेत. म्हणजेच काय तर डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यांचा जो विवक्षित आकृतिबंध आहे आणि ज्याच्यात त्याच्या मोठेपणाचे मर्म आहे त्या आकृतिबंधाकडे हे सर्वजण दुर्लक्ष करू पाहातात.

डोस्टोव्हस्कीची वैचित्र्यपूर्ण आणि मॉर्बिड किंवा काहीशी मनोविकृत पात्रे हा एक कल्पनेचा खेळ म्हणता येईल. कल्पनाशक्ती चालवल्यास कोणालाही तशी वैचित्र्यपूर्ण पात्रे निर्माण करता येतील. परंतु कोठलाही शहाणा मनुष्य थोडक्याच काळात अशा प्रकारच्या विक्षिप्त पात्राना सोडचिठ्ठी देऊन सुस्पष्ट कल्पनांच्या मागे जाईल. डोस्टोव्हस्की हा बिचारा फेफऱ्या गृहस्थ होता ही गोष्ट तर खरीच! कोणाला त्याला प्रेषित म्हणायचे असेल तरीही त्याला आपण हरकत घेता नये. परंतु कादंबरीकार डोस्टोव्हस्की हा मोठा साहित्यकार, एक कुशल लेखक (क्राफ्टमन) आहे हे आपण विसरता कामा नये. डोस्टोव्हस्की कादंबरीकार होता. आणि कादंबरी लेखनाच्या तंत्रावर त्याची पक्की पकड होती. एवढेच नव्हे तर कादंबरी लेखनाच्या क्षेत्रातला डोस्टोव्हस्की हा कादंबरीच्या आकृतिबंधाच्या बाबतीतला फार मोठा प्रयोगकारही होता.

कादंबरी हा एक अतिसंथ असा लेखनप्रकार आहे असे वर आपण म्हटले. आपल्या या म्हणण्याचे डोस्टोव्हस्की हे चालतेबोलते उदाहरणच म्हणता येईल. त्याच्या जवळपास सगळ्याच कादंबऱ्या प्रमाणाबाहेर मोठ्या आहेत. परंतु त्यांची कथानके तेवढीच छोटी आहेत. अगदी चारदोन पाने सांगून संपतील अशी. कधी, कधी तर तीन दिवसात, नव्हे काही तासात घडून गेलेले प्रसंग सांगण्यासाठी डोस्टोव्हस्की दोन दोन खंड आणि हजारावर पाने घेताना दिसतो. आणि तरीही ही हजारभर पाने कोठेही कंटाळवाणी वाटत नाहीत. तर अत्यंत प्रखर, प्रभावी-जिवंत वाटतात. वाटतात की नाही ? ही प्रखरता किंवा हा भावनिक आवेग घटनांची रांग रचून निर्माण करता येत नाही. घटनांची रेलचेल केल्यास अशा प्रकारचा भावनिक आवेग निर्माण करता येतो असे मानणे चूक ठरेल. खरी गोष्ट यापेक्षा विरुद्ध आहे. थोड्याच घटना पण बारक्यासारक्या बारकाव्यांसह जर अगदी हुबेहूब देता आल्या तर, ' साक्षात अनुभवता ' आल्या तर असा आवेग निर्माण होऊ शकतो. कादंबरीची घनता किंवा डेन्सिटी हा उत्तम कादंबरीचा विशेष म्हणता येईल. पण ही घनता प्रसंगांची संख्या वाढविल्याने निर्माण होत नाही. तर थोडेच प्रसंग पण त्यातील प्रत्येक प्रसंग बारीकसारीक तपशिलाद्वारे साकार केला गेल्याने ती निर्माण झालेली असते.

डोस्टोव्हस्कीची पात्रे पानेच्या पाने बोलत असतात, पानेच्या पाने भरून त्यांची संभाषणे डोस्टोव्हस्की लिहून काढतो. परंतु या लांबलचक संभाषणामुळे ती पात्रे सजीव होऊन उठतात. नेमके पात्रांचेच जर वर्णन दिले असते तर ही जादू साधली नसती.



अनुक्रमणिका



वरवर पाहिले तर असे वाटावे की डोस्टोव्हस्की आपल्या पात्रांची नेटकी व्याख्या देत आहे. कारण कोठलेही नवे पात्र कथेच्या ओघात आले की डोस्टोव्हस्की त्याचे सगळें चरित्र आपणाला सांगतो, तो अमका आहे. तो असा आहे. तसा दिसतो, वगैरे. हे वर्णन वाचून आपणास असे वाटावे की आता कोठल्या प्रकारच्या पात्राशी आपली गाठ आहे हे आपणास कळले आहे. परंतु डोस्टोव्हस्कीची पात्रे हालचाल करू लागली–म्हणजे बोलू लागली, काही ना काही कृती करू लागली की लगेच आपल्या ध्यानात येते की आपली फसगत झाली आहे, मगाशी जे वर्णन आपण आपल्या डोक्यात साठविले ते उगाचच होते. लेखकाने दिलेल्या त्यांच्या तथाकथित व्याख्येप्रमाणे वागायचेच जणू ही पात्रे नाकारतात व स्वतःच्या मर्जीप्रमाणे वागू लागतात. मग असे घडते की लेखकाने त्यांच्यासंबंधी जे एक तात्त्विक शब्दचित्र ( conceptual image ) आपणाला अगोदर दिलेले असते ते बाजूला सरकते आणि त्या चित्राच्या जागी एक नवेच चित्र पुढे येऊ लागते; लेखकाने दिलेल्या पहिल्या वर्णनाला छेद देऊन. गंमत म्हणजे ही दोन्ही चित्रे अजिबात जमत नाहीत. पण त्याचमुळे आपण त्या त्या पात्रात किंवा व्यक्तिरेखात आणखी आणखी गुंतू लागतो. त्या व्यक्तिरेखा आपणाला आणखी आणखी मजेदार वाटू लागतात. कारण लेखकाने दिलेल्या प्रारंभिक शब्दचित्राशी आपणाला त्यांची तुलना करावयाची असते. आणि असे करता करता त्या व्यक्तिरेखांचे खरेपणा, त्यांची वास्तवताही वाढत जाते. त्या व्यक्तिरेखा सजीव बनतात. डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यातल्या व्यक्तिरेखांच्या बाबतीत जे आपण करतो तेच आपण प्रत्यक्ष आयुष्यातही करीत नसतो काय? आयुष्यात हरघडी आपणाला अनेक प्रकारची माणसे भेटतात. निव्वळ योगायोगाने. जेव्हा ती भेटतात तेव्हा त्यांची ओळख करून द्यावयास, त्यांच्या स्वभावाचे वर्णन द्यावयास कोणीच जवळपास नसते. मग आपणच त्यांच्या स्वभावासंबंधीचे काही अंदाज बनतो. पुढे आपल्या ध्यानात येते की आपले अंदाज चुकले आहेत. ते सुधारले पाहिजेत. पण त्याच्याचमुळे ही सर्व माणसे आपल्याप्रमाणेच स्वतंत्र आहेत, स्वतःच्या हक्काने जगात वावरत आहेत हे आपल्या मनावर बिंबते. **डोस्टोव्हस्कीचा** "वास्तववाद" हा अशा प्रकारचा आहे. डोस्टोव्हस्कीचा "वास्तववाद" हे शब्द मी मुद्दामच वापरले आहेत. आपल्या दृष्टीने वास्तववाद म्हणजे प्रत्यक्ष जीवनाचे अनुकरण व चित्रण. डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यात येणारी माणसे व घडणारे प्रसंग वास्तववादी असतात म्हणून डोस्टोव्हस्की हा वास्तववादी लेखक आहे असे नव्हे तर त्याच्या कादंबऱ्यातून जी माणसे व घटना येतात त्यांच्याशी वागताना प्रत्यक्ष आयुष्यात खऱ्याखुऱ्या माणसांशी व घटनांशी ज्या प्रकारे आपणाला वागावे लागते, तसे वागावे लागत असल्याने डोस्टोव्हस्की हा वास्तववादी लेखक आहे. डोस्टोव्हस्की प्रत्यक्ष जीवनात आढळतील अशी खरीखुरी

पात्रे व प्रसंग आपल्या कादंबऱ्यातून वापरतो म्हणून "वास्तववादी" नसून प्रत्यक्ष आयुष्याची जी घाटणी आहे तशी घाटणी (तसा फॉर्म–आकृतिबंध) तो कादंबरी-लेखनात वापरतो म्हणून तो वास्तववादी आहे. जीवनाचीच घाटणी त्याने लेखनप्रकारात वापरल्याने डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्या "वास्तववादी" झाल्या आहेत. कारण त्या विवक्षित घाटणीमुळे त्याच्या व्यक्तिरेखांबरोबर वागताना प्रत्यक्ष आयुष्यातल्या माणसांबरोबर व प्रसंगांबरोबर जसे आपणास वागावे लागते तसेच त्यांच्याशीही वागावे लागते.

पात्रांच्या स्वभावाच्या बाबतीत प्रत्येक पावलागणिक डोस्टोव्हस्की आपणाला चकवतो. कोठल्याही पात्राचे पूर्ण आणि अंतिम वर्णन आधी तो देत नाही, परंतु पावलोपावली जसजशी त्यांची एकएक वागणूक आपल्या दृष्टोप्तत्तीस येऊ लागते तसतसा त्यांच्या स्वभावाचा एकएक अज्ञात पैलू आपल्यासमोर उघड होऊ लागतो आणि अशा प्रकारे त्यातील प्रत्येक पात्र जणू काही आपल्या डोळ्यादेखतच घडत गेल्याचा भास आपणाला होतो. डोस्टोव्हस्कीचे कोठलेही पात्र साच्यावरहुकूम नसते. प्रत्यक्ष आयुष्यात माणसे जितकी संदिग्ध असतात तितकीच त्याची पात्रेही संदिग्ध आहेत. आणि ही संदिग्धता तो शेवटपर्यंत टिकवतो. त्यामुळे त्यांच्या बाबतीत कोठल्याही क्षणी वाचकाला बेसावध राहाता येत नाही. किंवा ती अशीच आहेत असे गृहितही धरून चालता येत नाही. तर चुका करत व त्या चुका सुधारत, सुधारत त्याला त्या हजारभर पानातून वाट काढावी लागते व स्वतःच स्वतःसाठी त्या त्या पात्रांची कल्पना तयार करावी लागते.

डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यांची मांडणी अशी आहे की त्यात जी पात्रे येतात त्यांच्याशी वागताना प्रत्यक्ष आयुष्यात खऱ्याखुऱ्या माणसाच्या बाबतीत जशा व ज्या प्रकारच्या प्रतिक्रिया आपण व्यक्त करतो तशा व त्या प्रकारच्या प्रतिक्रिया आपणास व्यक्त कराव्या लागतात. त्यामुळे त्या पत्रात आपण स्वाभाविकरित्या गुंततो. ती पात्रे खरोखरीची माणसे बनतात. डोस्टोव्हस्कीने वापरलेल्या या क्लृप्तीमुळे डोस्टोव्हस्की इतरापेक्षा वेगळा बनतो. डोस्टोव्हस्कीच्या पुस्तकांचे इतर गुणदोष काहीही असोत वर उल्लेखिल्या त्या क्लृप्तीमुळे डोस्टोव्हस्कीची पुस्तके कधीही खोटी आणि सांकेतिक वाटत नाहीत. कोठेही ती नकली वाटत नाहीत. एवढेच नव्हे तर ती खरी वाटावीत म्हणून कोठल्याही प्रकारचे नाटकी व कृत्रिम आधार त्याना द्यावे लागत नाहीत. वाचायला सुरवात केल्यापासूनच वाचक एक प्रकारच्या परिणामकारक आणि भक्कम अशा दर्शनी–वास्तव सृष्टीत वावरू लागलेला असतो. कादंबरी आणि इतर साहित्यप्रकार यात फरक आहे. कादंबरी वाचताना आपण कादंबरी वाचत आहोत असे वाचकाला वाटत राहाता कामा नये. म्हणूनच खोट्या व कृत्रिम क्लृप्त्या कादंबरीच्या दर्शनी–वास्तवपणाला मारक ठरतात. (ज्ञानेश्वरांच्या जीवनावर कादंबरी लिहिताना ज्ञानेश्वरकालिन भाषा







वापरणे हा यातलाच एक हास्यास्पद प्रकार. जणू ती कादंबरी ज्ञानेश्वर आणि त्यांचे समकालिनच वाचणार असतात! ) कादंबरी हा एक खास वाङमयप्रकार आहे. कादंबरी वाचताना आपण कादंबरी वाचत नसून त्या त्या व्यक्तींचे प्रत्यक्ष जीवनच पाहात आहोत असे वाचकाला वाटण्यावरच कादंबरी या वाङमयप्रकाराचे यश अवलंबून असल्याने पात्रांच्या मागे टांगून ठेवलेले पडदे आणि वत्त्या वाचकाच्या नजरेसही पडता कामा नयेत. अनेक कादंबऱ्या अशा असतात की पदोपदी आपला स्वप्नभंग होतो. कारण कादंबरी उभी करण्यासाठी जी बाह्य चौकट कादंबरी-काराने उभारलेली असते त्याची अनेक टोके पानापानावर आपणास बोचतात आणि कादंबरीच्या स्वप्नातून आपणास जागे करतात.

उत्तम कादंबरीची काही लक्षणे वर आपण पाहिली. उत्तम कादंबरीतल्या व्यक्तिरेखा आधीपासून केव्हाही निश्चित स्वरूपात सांगितल्या जात नाहीत. थोडक्यात, वाचकाला प्रथमपासून त्यांची व्याख्या सांगण्यात येत नाही. तसेच काळ आणि स्थळ या बाबतीत अशा कादंबऱ्या पसरट नसतात. त्यात अंतर्भूत असणारा काळ फार मर्यादित असतो. तीच गोष्ट स्थळाचीही. स्थळही मर्यादेतच असते. काळ आणि स्थळ आकुंचित केल्याने कादंबरीचा वेग मंदावतो, ती संथ बनते ही गोष्ट खरी. पण त्याच्याचमुळे ती अधिक वास्तवतापूर्णही बनते. डोस्टोव्हस्कीच नव्हे तर ज्या ज्या जुन्या कादंबऱ्या आजही टिकून राहिल्या आहेत त्यातही हेच विशेष आढळतात. उदा. स्तांधाल हा फ्रेंच कादंबरीकार घ्या. Red अँड ब्लॅक ही त्याची एक नामांकित कादंबरी. ही कादंबरी चरित्रात्मक आहे आणि त्यात कोणा एकाच्या आयुष्यातील काही मोजक्या वर्षांचे वर्णन आले आहे. ही एकूण तीन किंवा चार चित्रे असतील. आणि यातील प्रत्येक चित्र आपापल्या तपशिलाने परिपूर्ण असल्याने ती वाचताना एक खरे आयुष्यच आपल्यापुढे उलगडत असल्याचा भास आपणाला होतो. मोजकी वर्षे आणि मोजकी ठिकाणे घेतल्याने कादंबरी जेथल्या तेथे झाली आहे आणि विसविशितपणापासून वाचली आहे.

प्रुस्त ( Proust ) हा गद्यलेखन करणारा डोस्टोव्हस्कीसारखा दुसरा मोठा कादंबरीकार. त्याच्याही कादंबरीलेखनाचे वैशिष्ठ्य आंतरिक रचना-मांडणी किंवा बांधणी हेच. किंबहुना त्याच्या बाबतीत तर कादंबरीच्या मोठेपणातील बांधणीचे महत्व आणखिनच ठळकपणे उठून दिसते. त्याच्या कादंबऱ्यातली ॲक्शन इतक्या संथ चालीने हालते की एक एक प्रसंग म्हणजे चित्रकलेतले स्थिरचित्र वाटावे. प्रगती नाही आणि कसला ताणही नाही. त्याची "Remembrance of things Past" ही कादंबरी वाचली तर असे दिसून येईल की या कादंबरीने संथपणाची अंतिम हद्द गाठली आहे, इतकी ती हळू चालते. बरे भरगच्च कथावस्तू म्हणावी तर तसेही नाही. कथावस्तू नाहीच म्हटले तरी काही बिघडणार नाही. कथावस्तू-बरोबरच नाट्यही तेथे अजिबात नाही. थोडक्यात, ही कादंबरी म्हणजे वाता-

वरणाचे केवळ निस्तब्ध वर्णन आहे. अर्थात साहित्याच्या या विवक्षित प्रकारासाठी तेच बरोबर जरूरीचे आहे. या कादंबरीकडे पाहिले की असे वाटते की तिला आतला घट्ट सांगाडाच नाही. ताड्या घड नसलेल्या छत्रीगत. म्हणून मी म्हटले की अॅक्शन आणि प्लॉट किंवा घटना आणि कथावस्तू याना आधुनिक कादंबरीच्या रचनेत स्थान जवळजवळ अजिबात नाहीच. अर्थात त्याना अजिबात वगळूनही चालणार नाही. हारासाठी जसा दोरा लागतो, छत्रीसाठी जसा ताड्यांचा सांगाडा लागतो किंवा तंबूसाठी जसे बांबू लागतात तेच महत्त्व कथावस्तू व घटना याना आधुनिक कादंबरीत आहे.

— क्रमशः

---

## "नवी क्षितिजे" विषयी माहिती

प्रकाशन स्थळ : ३२९, वि. प. रोड, मुंबई ४.

प्रसिद्धीचा नियतकाल : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर महिन्याच्या पहिल्या तारखेला)

मालक<br>मुद्रक<br>प्रकाशक } सौ. शुभांगी जोशी

राष्ट्रीयत्व : भारतीय

पत्ता : ३२९, वि. प. रोड, मुंबई ४.

संपादक : १) श्री. विश्वास पाटील

राष्ट्रीयत्व : भारतीय

पत्ता : पुष्प कुंज, पालखी वाडी, १३, काशिनाथ धुरु रोड, मुंबई २८.

२) श्री. नाना जोशी

राष्ट्रीयत्व : भारतीय

पत्ता : ३२९, वि. प. रोड, मुंबई ४.

मी सौ. शुभांगी जोशी जाहीर करते की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे बरोबर आहे.

१ जानेवारी १९७५

सौ. शुभांगी जोशी<br>प्रकाशक